# मराठीचा संसार



लेखक

**विठ्ठल कृष्ण नेरूरकर,** बी. ए.

टॉलस्टॉयचें तत्वज्ञान, आत्मविकास,
उत्कर्ष सोपान, दुधारी सुरी, शीलाचें
मोल, देशाचें वैभव, अकबराचें
वेदसाधन वगैरे पुस्तकांचे कर्ते.

१९२८



किंमत १ रुपया.

# प्रस्तावना.

रा. नेरूरकर यांचा प्रस्तुत ग्रंथ अगदीं योग्य वेळीं प्रसिद्ध होत आहे. मराठीचा संसार कोठवर आला आहे आणि कसा चालला आहे या प्रश्नाकडे जनतेचें लक्ष्य अधिकाधिक लागत चाललें आहे म्हणजेच जनतेंत कर्तव्य-जागृति अधिकाधिक होत आहे. कोणत्याही राष्ट्राची जागती भाषा ही त्याच्या व्यवहाराचें एक प्रमुख साधन असल्यामुळें तें साधन जितकें संपन्न करवेल तेवढें करणें हें त्या राष्ट्रांतील सर्व सुबुद्ध घटकांचें पवित्र कर्तव्य होय. त्या साधनाच्या मार्गांतील कांटे आणि अडचणी दूर करून तो मार्ग वाहता आणि निर्भय ठेवला पाहिजे.

जर करतां महाराष्ट्र हें एक राष्ट्र समजावयाचें असेल आणि त्याचा यापुढील संसारहि त्याच कल्पनेनें चालवावयाचा असेल तर त्याची जी चालती भाषा असेल तिची सर्वभावें जोपासना करणें ओघासच येतें. प्रस्तुत तिचा कोंडमारा दोन बाजूंनीं होत आहे म्हटलें तर या दोन्ही बाजूंकडून मराठीवर पुष्कळ उपकार झाले आहेत आणि पुढेंहि होतील. एक बाजू म्हणजे घरचीच आहे--संस्कृताची आणि दुसरी म्हणजे पाहुण्यांची--इंग्रेजीची. संस्कृताचा व मराठीचा संबंध निकट आहे आणि संस्कृतांतील ज्ञानाचा अपूर्व सांठा हा मराठीचा ठेवा अथवा संचितनिधि आहे. यथाप्रसंग आणि यथाशक्ति आपण तो अभिमानानें उपयोगास आणण्याचा आपल्याला पूर्ण अधिकार आहे. तथापि राष्ट्रीय जीवनांत संस्कृताचा मान कसा ठेवावयाचा आणि त्याचा भरपूर उपयोग कसा करून घ्यावयाचा याविषयीं सांप्रतच्या आंग्लशिक्षितांपैकीं पुष्कळांच्या ठायीं कांहीं भ्रामक कल्पना रूढ आहेत. मातृभाषेशीं चांगला दृढ परिचय होण्याच्या आधींच सर्वांच्या डोक्यावर सरसकट संस्कृताचा भार द्यावयाचा आणि तें संस्कृत इंग्रजीच्या द्वारें शिकवावयाचें ! ! वास्तविक संस्कृतांतील ज्ञानसंपत्ति लुटून मातृभाषेचें ऐश्वर्य वाढवावयाचें तें राहिलें बाजूला आणि इंग्रजींतून संस्कृत शिकून शिकवून उलट मातृभाषेवरच गुरगुरावयाचें असा विपरीत सांप्रदाय आचरणांत आलेला दिसतो !

गेल्या ८।ऊणशें वर्षांत नुसते आमचे पवित्र वेदग्रंथदखाल मराठींत संपूण उतरविण्याचें श्रेय या नवशिक्षितांनीं घेतलें नाहीं. उलट नवें शिक्षण मिळालें नसतांनाहि आमच्या जुन्यापुराण्या शास्त्रीमंडळींनीं या दिशेनें केलेलें कार्य पहा! कृष्णशास्त्री राजवाडे, पितापुत्र लेलेशास्त्री, विष्णुशास्त्री बापट, केमकर शास्त्री, भाऊशास्त्री लेले, वासुदेवशास्त्री अभ्यंकर, राशिवडेकरशास्त्री, घुलेशास्त्री, मुकुंद-शास्त्री मिरजकर यांचे उद्योग किती प्रचंड झाले? अशांनाच भरपूर उत्तेजन मिळतें किंवा मिळेल तर संस्कृतांतील निखिल ज्ञानभांडार हे रितें करून मराठीचीं कोठारें भरून टाकतील! वास्तविक ही जुनी शास्त्रीमंडळीदेखील प्राकृतांच्या वेगिवर्गांतलीच होत. संस्कृत ही देववाणी तादितर त्या प्राकृतवाणी. त्या मूर्खांच्या वाणी, विद्वानांच्या नव्हेत असा ताठर बाणा यांचा कैक शतकें होता. अजूनहि त्याची धुगधुगी कायम असणारच. परंतु भोंवतालची सृष्टि प्राकृतमय झालेली पाहून यांची दृष्टि निवळून ते व्यवसाय दृष्टीनें म्हणा किंवा ज्ञानप्रसाराचे इच्छेनें ह्मणा संस्कृतांतील भांडार मराठींत परिश्रमानें रिचवूं लागले होते. परंतु शास्त्री मंडळीचा वरचष्मा इंग्रजी काळांत राहिला नाही.

आपली नवशिक्षित आंग्लभाषापटु विद्वान मंडळी यांनीं सर्वज्ञत्वाचा मक्ता आपणांकडे उचलला! इंग्रजीपुढें सर्व तुच्छ होऊन हजारों वर्षें जगताला ज्ञानानें उजळून काढणारी पवित्र देववाणी आणि तिच्या वृद्धापकाळीं पुढें सर-सावलेल्या तिच्या प्राकृत लेकीसुनांचा मेळा या इंग्रजीपुढें शिर लववून उभा राहिला! असा मनु फिरला! पुढें संस्कृताची स्थापना कशीबशी नवी शिफा-रस होऊन पुनः झाली. परंतु देशी भाषांची दाद कोणीच घेईना! इंग्रजी जर या देशांतील बहुसंख्याक लोकांची जन्मभाषा झटकन् करितां येईल तर तस प्रयोग करण्याचा मोह होणें यांत कांहीं तरी अर्थ होता. परंतु गेल्या १५० वर्षांत अद्याप स्वभाषेंतून द्यावयाचें प्राथमिक शिक्षण देखील शेंकडा १० पर्यंत प्रसार पावलें नाहीं मग इंग्रजी मातृभाषा करावयाची म्हटल्यास बेझंटबाईंच्या हिशेबानें दोन हजार नसलीं तरी दोनशें वर्षें सहज पाहिजेत. आणि तो उद्योग संपून इंग्रजीचें नवें हत्यार तयार होऊन हातीं येण्याचें 'ऐन रंगांत आपण यावें' आणि राजवाडे यांनी ( पुणें येथील शारदोपासक संमेलन पहिलें. अध्यक्षपीठावरून केलेलें भाषण ) ह्मटल्याप्रमाणें खुद्द इंग्रजांनीच

आपणांला सोडून गेलेलें असावें असा विपरीत प्रसंग इतिहासांतील पूर्वपरिचया-नुसार यावयाचा तो अनुभवाला यावा ! तात्पर्य इंग्रजी मातृभाषा करण्याची ही सोय वैवस्वत मन्वंतरांत यशस्वी होण्यासारखी नसल्यानें निराशेनें सोडून द्यावी लागते. देववाणीकडे पहावें तों लोकव्यवहाराचा कारभार तिनें सोडल्यास केक शतकें लोटलीं ! म्हणजे इंग्रेजीच्या आशेला लागावें तर भविष्याच्या दिशेकडे आनंत्यांत बुडावें आणि देववाणीच्या पुनरुद्धारासाठीं कास कसावी तर भूताच्या दिशेकडे अव्यक्ताच्या तमांत लोप पावावें अशी उभय बाजूनें अडचण येत्ये. त्यापेक्षां दोन्ही दिशांनीं जो ज्ञानगंध वाहून येईल तो आपल्या मातृभाषेच्या घरांत बसून ऐताच उपभोगावा हाच उत्तम मार्ग दिसतो.

ज्ञानोबा एकोबांनीं मराठींत कां लिहिलें ? प्राकृत जनांना संस्कृत कळेना म्हणून. संस्कृताच्या आश्रयाशिवाय कळणाऱ्या भाषेंत त्यांनीं संस्कृताचा गुह्य अर्थ प्रगट केला. असें जर आहे तर तें मराठी शिकण्याला आणि समजण्याला संस्कृत आधीं शिकलें पाहिजे हें बोलणें किती अडाणी आहे ! लॅटिन ग्रीक या भाषांचें जर ज्ञान असेल तर इंग्रजी वगैरे युरोपीय भाषांचें ज्ञान व अध्ययन करणें सुलभ होईल म्हणून लॅटिन आधीं शिकून मग इंग्रजी फ्रेंच शिकणें कोणी प्रशस्त मानतात काय ? वास्तव अशी उलटी दृष्टि सर्वथा भ्रामक म्हणून त्याज्य होय आणि सरळ सिद्धांत हाच कीं देशभाषा हीच आपली प्रधान व्यवहार भाषा. तिचें अध्ययन आवश्यक समजलें पाहिजे. तिच्यांतून +

---

+ टीपः—तिऱ्हाइतपणें परंतु सहानुभूतीनें पहाणाऱ्या गृहस्थांस हा विषय नीट समजूं लागला आहे. नुकताच हालंड या नांवाच्या विद्वान ख्रिस्ती मिशनरीनें 'इंडियन औटलुक' नामक ग्रंथांत परभाषेतून शिक्षण दिल्यानें श्रम व प्रयत्न व्यर्थ जाऊन बौद्धिक वांझपणा येतो ( पृ. १०६ ) असें सांगून उच्च शिक्षणसुद्धां देशी भाषांतून देण्यास अनुमति दर्शविली आहे. त्यांनीं असाहि अभिप्राय दर्शविला आहे कीं ही मागणी किंवा इच्छा यांचा हेतु विघातक नसून विधायक आहे. भारतीय बुद्धिसूर्याची अरुणप्रभा सांप्रत फांकली आहे असें ते सांगतात. ( पृ. १०७. ) त्यांचीं मूळवाक्यें पहाः...

सर्व अध्यापन झालें पाहिजे. तिच्यांत जे विषय किंवा ग्रंथ नसतील त्यांचा भर तिच्यांत सतत टाकिली पाहिजे आणि ती विश्वसमूहांत अग्रस्थानीं चमकत राहील अशासाठीं झटलें पाहिजे. ते श्रम टाकून तिच्या गरिबीवर रुसून रागानें हट्टानें किंवा अज्ञानानें तिच्या पायांत जीर्ण भाषेच्या बिड्या ठोकून किंवा तिच्या गळ्याभोंवतीं परभाषेचा पाश घालून तिची उन्नति करण्याची आशा राखणें म्हणजे एखाद्यास उपाशी ठेवून त्यास लठ्ठ व बलिष्ठ करण्यास झटण्याइतकेंच शहाणपणाचें होणार आहे!

रा. नेरूरकर यांनीं या ग्रंथाचे द्वारें जो इतिहास व जे विचार सुज्ञ वाचकवर्गापुढें ठेविले आहेत ते वाचून वाचकांस त्यांचें म्हणणें बहुतांशीं ग्राह्य वाटेल असें मला वाटतें. रा. नेरूरकर यांनीं आपला ग्रंथ आटपसरपणें लिहिला असून आपल्या विधानांस जागजागीं आधार दिले आहेत. त्यांचें प्रतिपादन विशद आणि मनाला पटणारें असें उतरलें असल्यानें या ग्रंथानें एका उपयुक्त पुस्तकाची जोड त्यांनीं मराठी वाचकांस करून दिल्याचें श्रेयहि त्यांस अवश्य दिलें पाहिजे.

पुणें,
नागपंचमी १८४९

दत्तो वामन पोतदार.

---

"Education through the medium of a foreign language wastes labour, exhausts effort, and strangles originality. It dooms the Universities of one of the most gifted nations in the world to intellectual sterility. Indian students learn; they do not think ... ... ... ... ... ... ...

It is not merely the language which is foreign: the whole curriculum is foreign ... ... ... ... education in the schools and ultimately even in the Universities shall be through the medium of the Vernacular. And the reaction is not negative but constructive and creative ... ... ... We are on the verge of a new liberation of Indian intellect."

# हकीकत.

मराठीचा संसार ' या नांवावरूनच या पुस्तकांत मराठी भाषेच्या प्रौढ स्वरूपाचा परिचय स्थूलपणें वाचकांस करून दिलेला आहे, हें सहजच लक्षांत येण्यासारखें आहे. मराठी भाषा ही आतां लहान मुलगी राहिलेली नसून आपल्या घरच्या संसाराचा बोजा आपल्या शिरावर वाहण्यास ती समर्थ झालेली आहे. आजपर्यंत अनेक प्रकारची परतंत्रता व सासुरवास तिला सोसावा लागलेला आहे. परंतु आतां ती स्थिति तशीच चालूं देणें योग्य होणार नाहीं.

प्रवेशपरीक्षेला मराठी नेमलें गेल्यानंतर कॉलेजच्या पुढच्या परीक्षांतही मराठीच्या अभ्यासाची सोय असावी हें आपोआपच ठरतें. तथापि कोणत्या ना कोणत्या कारणानें ती गोष्ट अद्याप घडून आलेली नाहीं. शिक्षणाचें माध्यम शिकणाऱ्यांची मातृभाषाच असली पाहिजे हें तत्व सर्वसंमत असूनही त्या तत्वानुसार मराठीच्या बाबतींत आचरण घडत नाहीं. तेव्हां मराठीला शिक्षणाचें माध्यम होण्याची पात्रता व उच्च परीक्षांत तिचा समावेश होण्याची आवश्यकता हे विषय आज चर्चेला निघाले असतां आपलीं मतें जनतेच्या समोर मांडावींत अशा हेतूनें हें पुस्तक लिहिलें आहे.

हें पुस्तक लिहून आज बरोबर दोन वर्षें झालीं. तथापि अनुकूल संधि न आल्यामुळें तें अप्रकाशित राहिलें. तें प्रकाशित होऊन त्याची सुज्ञ वाचकवर्गाच्या हातांत जाण्याची पात्रता आहे कीं नाहीं याविषयींही मन थोडेंसें साशंक होऊं लागलें. म्हणून तें प्रो. पोतदार यांच्यासारख्या विद्वान् भाषाकोविदांच्या नजरेसमोर ठेवण्यांत आलें. त्यांचें प्रोत्साहक पत्र हातीं पडतांच हुरूप आला व त्यांनींच सुचविल्याप्रमाणें प्रि. घारपुरे यांची भेट घेऊन हें पुस्तक प्रकाशित करण्याचें ठरलें. दरम्यान कुलपति नानासाहेब वैद्य यांनींही याच्यावरून नजर फिरवून आपलें समाधान व्यक्त केलें. तेव्हां तर विशेषच उत्साह आला.

या पुस्तकाला पुढें आणण्यांत प्रो. पोतदार यांची तर फारच मदत झाली आहे. पण नानासाहेब वैद्य व प्रि. घारपुरे यांचेही आभार मानणें माझें कर्तव्य

आहे. वेळांत वेळ काढून हें पुस्तक समग्र वाचून त्याला प्रस्तावना लिहिण्याची तसदी घेऊन प्रो. पोतदार यांनीं मला कायमचा ऋणी करून ठेवलें आहे.

इतकी सर्व पूर्वतयारी झाली तरी **श्रीमंत बाबासाहेब घोरपडे इचल-करंजी संस्थानाधिपति** यांनीं पुस्तकप्रकाशनाची जी योजना करून ठेविली आहे, तिच्या आधारानेंच हें पुस्तक मुद्रणालयांतून बाहेर पडूं शकलें असल्यामुळें श्रीमंतांचा मी सर्वस्वीं उपकृत आहें.

या पुस्तकांत घेतलेल्या इंग्रजी उताऱ्यांचें भाषांतर त्या त्या उताऱ्याखालीं सामान्य वाचकांसाठीं जोडलेलें आहे. हें शब्दशः भाषांतर नसून मूळ कल्पना आणून देणारें रूपांतरवजा भाषांतर आहे असें म्हटल्यास चालेल. सुज्ञ वाचकांनीं उपयुक्त सूचना केल्यास द्वितीयावृत्तीचे वेळीं त्यांचा विस्तार अवश्य केला जाईल.

शेवटीं छापखान्याचे मालक श्री. **अनंत विनायक पटवर्धन** यांनीं या पुस्तकाच्या छपाईचें काम थोडया अवधींत फार सुबक करून दिल्याबद्दल त्यांचेही आभार मानून मी वाचकांची रजा घेतों.

या पुस्तकांतील माझ्या विधानांच्या पुष्टीकरणार्थ ज्या ज्या गृहस्थांच्या पुस्तकांतील मला उतारे घेतां आले त्यांचाही मी फार आभारी आहें.

आंबोली<br>ज्येष्ठ शु॥ १५<br>शके १८५० } वि. कृ. नेरूरकर.

# प्रशंसन.



रा. नेरूरकर यांचा ‘ मराठीचा संसार ’ हा ग्रंथ मनोवेधक व उद्बोधक असून तो वाचकांपुढें ठेवण्यास अत्यंत योग्य आहे हें मी पूर्वींच सांगितलें असल्याचें रा. नेरूरकर यांनीं आपल्या हृद्गतांत नमूद केलेंच आहे. त्यांच्या या ग्रंथानें मराठीच्या प्रगतीचा परिपाक सर्वत्र बोधभाषा होण्यांत होईल तो दिवस सुदिन होय. पाण्यांत घुसल्याशिवाय पोहतां येत नाहीं आणि पोहतां येत नाहीं म्हणून पाण्यांत जाऊं देत नाहींत. अशी मराठीची स्थिति झाली आहे. भाषान्तरित ग्रंथापेक्षां प्रत्येक विषयावर स्वतंत्र मराठींत ग्रंथ होऊं लागतील, तेव्हां मराठीची पात्रता जास्त निदर्शनास येईल. अशापैकीं हा स्वतंत्र ग्रंथ असून तो लोकादरास पात्र होईल अशी मला आशा आहे.

पुणें, ता. ८-६-२८. **चिंतामण विनायक वैद्य.**

# अनुक्रमणिका.


| | | |
|---|---|---|
| १. | प्रास्ताविक ... ... ... | १—६ |
| २. | एका शतकाचा संक्षिप्त इतिहास ... | ६—१५ |
| ३. | भाषा आणि पाठांतर ... ... | १६—२२ |
| ४. | मातृभाषेचें महत्त्व... ... ... | २३—३० |
| ५. | मराठीस संस्कृताचें साहाय्य ... ... | ३१—३६ |
| ६. | मराठीची बोधभाषा होण्याची पात्रता ... | ३७—४१ |
| ७. | इंग्रजी व बंगाली ... ... ... | ४१—४५ |
| ८. | मातृभूमि आणि मातृभाषा ... ... | ४५—५२ |
| ९. | आक्षेपांचें निरसन ... ... | ५२—५६ |
| १०. | पद्य आणि गद्य ... ... ... | ५७—६३ |
| ११. | इंग्रजीला बोधभाषेचा दर्जा कसा मिळाला ? | ६३—७३ |
| १२. | जपानी भाषेचा दाखला ... ... | ७४—८० |
| १३. | एतद्देशीय कांहीं भाषांचे दाखले ... | ८१—८८ |

# मराठीचा संसार.

## प्रकरण १ लें.

### प्रास्ताविक.

संसार म्हटला कीं तो सुखदुःखमिश्रितच असावयाचा. त्यांत एकांतिक सुख सांपडायाचें नाहीं. मग तें तुकाराम महाराजांच्या उक्तीप्रमाणें "जवापाडें" असो, कीं आधुनिक पाश्चात्य तत्त्वज्ञान्यांच्या मताप्रमाणें, सुखाचे प्रसंग फार येत असल्यामुळें ते स्मरणांतून नाहींसे होतात किंबहुना त्यांची आपणास जाणीवच नाहींशी होते, व दुःख अप्रिय असल्याकारणानें व तें मधून मधून क्वचित् प्रसंगीं येत असल्यामुळें तें आपणास वास्तविक असतें, त्यापेक्षां कितीतरी पटीनें जास्त भासतें, यामुळें दुःखच जवापाड असून, "सुख पर्वताएवढें" असो. संसार हा एकंदरींत पाहतां धक्काबुक्कीचा मामला आहे. व्यक्तीच्या प्रमाणेंच समष्टीच्याही संसाराला हें वर्णन सारखेंच लागू पडतें. मग तें भाषेच्या संसाराला कां नाहीं लागू पडणार ? तशांतही ज्या राष्ट्राला शतकोशतकें निर्भेळ स्वातंत्र्य लाभलें असेल, त्या राष्ट्राच्या भाषेचा संसारपथ अपवादादाखल गुलाबाच्या फुलांनीं भरलेला असेल कदाचित्. पण संसारपथांत कांटयांचाच प्रादुर्भाव फार ! राजकीय उलाढालींचा परिणाम भाषेवर तात्काळ होतो, व शिवाय तो दीर्घकालपर्यंत कायम राहतो. अर्थात् अशा राजकीय उलाढालींच्या धक्काबुक्कींत जी भाषा आपल्या जीवाची ढाल करून आपल्या राष्ट्राच्या संस्कृतीचा कलिजा शाबूत राखते, तिची थोरवी अवर्णनीयच म्हटली पाहिजे. भाषेच्या असल्या धक्काबुक्कीच्या संसारांत खऱ्या स्वाभिमानाचा आणि खुल्या सोवळेपणाचा सांवळागोंधळ होऊं देतां नये. परभाषेंतले जे शब्द सैंपाकघरापर्यंत- देवघरापर्यंत भिडून, तेथील तीर्थानें ते

भिजून पवित्र झालें, ते आत्मसात् झाले म्हणावयास हरकत नाहीं. त्यांना पुनरपि बहिष्कृत करणें म्हणजे विटाळलेला शरीराचा अवयव कापून टाकण्यासारखेंच होणार आहे. पण स्वाभिमानाची जागृति झाल्यानंतर केवळ दिखाऊपणाकरितां म्हणून नवीन परकीय शब्दांची आयात बंद करण्यास हरकत नाहीं. या धक्काबुक्कीच्या संसारांत आपल्या साधुसंतांनीं जो मार्ग शिकवून दिला आहे, त्याच मार्गानें जाणें इष्ट आहे. श्रीसमर्थ म्हणतात–

**वेडे करावे शहाणे । तरीच जिणें श्लाघ्यवाणें**
**उगेंच वाद्यांग वाडविणें । हें मूर्खपण ॥ १५।६।१५**
**मिळोन जाऊन मिळवावें । पडी घेऊन उलथावें ॥**
**कांहींच कळों न द्यावें । विवेक बळें ॥ १५।६।१६**

संसारांत अशा प्रकारें वागावें लागतें. संसारांत धक्काबुक्कीचे प्रसंग आहेत म्हणून त्यास भिऊन भागावयाचें नाहीं. तो सांग शेवटास न्यावाच लागतो. त्याचप्रमाणें सोवळेपणाच्या सीमांनीं स्वतःला अरुंद मर्यादांच्या आंत कोंडून घेऊनही चालावयाचें नाहीं. मराठी भाषेला आज कोणापासून त्रास सोसावा लागत आहे, तिच्या मार्गांत आज कोणकोणते अडथळे आहेत. याचें पूर्ण निदान करून त्याप्रमाणें उपाययोजना करावयाच्या कार्यास सर्वांनीं एकदिलानें लागलें पाहिजे. जेवढें एक पाऊल पुढें पडेल, तेवढ्याच्या जोरावर दुसरें पाऊल उचलून त्याच्यापुढें कसें ठेवतां येईल हें पाहणें जरूर आहे, व हें करीत असतांना पडलेलें पाऊल कायमचें स्थिर राहील कसें याचाही विचार केला पाहिजे.

मराठी भाषेच्या संसारांत आतांपर्यंत अनंत अडचणी आलेल्या आहेत आणि अझूनहि तिचा मार्ग निष्कंटक झालेला नाहीं. मराठी भाषेवर तिच्या जन्मापासूनच संकटें कोसळण्यास सुरवात झाली आहे. तिचा जन्म व पोषण ना घर ना दार अशा वारकरी साधुसंतांच्या घरीं झाल्यामुळें, थोरांमोठ्यांच्या आश्रयानें श्रीमंतीच्या वैभवांत मिरवणाऱ्या तिच्या आईस–संस्कृत भाषेस–तिला आपलेपणानें जवळ ओढावयास फार त्रास पडले. या बाबतींत वार-

करी व साधुसंतांनीं मराठी भाषेवर केलेले उपकार कधींही न फिटणारे असे आहेत. उर्दू, फारशी, अरबी भाषांचा सारखा हैदोस सुरू असतां पुराणिकांच्या व्यासपीठावरून आणि टाळमृदंगांच्या साथींतून मराठी भाषेचा पुरस्कार एकसारखा चालू राहिला म्हणूनच मराठी भाषेला आजचे हे दिवस पहातां आले. बाहेरून चढाईचा हल्ला करणाऱ्यांची गुरगुर, तशीच आंतून शेजारणींच्या धुसफुशीची कुरकूर, बिचाऱ्या मराठीला सदोदित ऐकावी लागली व लागत आहे. पूर्वीं उर्दू घरांत घुसूं पहात होती; आतां इंग्रजी पहात आहे. परंतु शेजार सीमांवर वास्तव्य करणाऱ्या कानडी, गुजराथी, तामीळ, तेलगू यांचीही चुरस मराठीला सहन करावी लागते. यांपैकीं गुजराथी व कानडी या मराठीच्या सीमाप्रांतावर मराठीस फार त्रास देत असतात. तथापि कसें झाल्या तरी त्या आपल्याचपैकीं आहेत. त्या संस्कृतीनें परक्या नाहींत. त्यांच्याशीं सलोख्याची देवघेव खुशाल करतां येईल. कारण त्या सर्वांचें मूळ एकच ठिकाणीं संस्कृतांत आहे. पण ज्या भाषेची संस्कृतिच मुळीं भिन्न आहे अशा भाषेशीं व्यवहार मराठीला फारच जपून करावयाचा आहे.

भारत–मंदिरांतील महाराष्ट्राच्या दालनांत मराठीनें आपला संसार थाटला आहे. भारतमंदिराच्या निरनिराळ्या दालनांतून निरनिराळ्या देशी भाषांनीं आपापला संसार खुशाल सजवावा. पण या सर्व वधूंना जो सावत्रनात्याचा त्रास सोसावा लागत आहे त्याला यापुढें प्रतिबंध होणें इष्ट आहे. मराठी वधूला या सावत्र नात्याचा सहवास व तद्भव त्रास बराच झाला आहे. यापुढें त्याला आळा पडलाच पाहिजे.

प्रत्येक महाराष्ट्रीयाला आपल्या मराठी मातृभाषेचा अभिमान व प्रेम असलें पाहिजे. मातृभाषा म्हणजे केवळ सहावा प्राण होय. याच्याहून भिन्न शब्दांनीं तिची थोरवी सांगावयास तसे शब्दच नाहींत. कारण राष्ट्राचें वाङ्मय राष्ट्राच्या मातृभाषेंत असतें. राष्ट्राच्या वाङ्मयांत राष्ट्राचा इतिहास, पूर्वपरंपरा, संस्कृति किंबहुना सारसर्वस्वच सांठलेलें असतें. म्हणून ज्या राष्ट्राला

आपली उन्नति साधावयाची असेल त्या राष्ट्रानें आपल्या मातृभाषेच्या उन्नतीच्या कार्यास झटून लागलें पाहिजे.

जगाचा इतिहास चाळून पाहिल्यास असें आढळून येईल कीं प्रत्येक जेत्या राष्ट्रानें प्रत्येक जित राष्ट्रावर अंमल गाजवितांना जित राष्ट्राची भाषा मारून त्या ठिकाणीं आपल्या भाषेचा झेंडा लावण्याचा शिकस्तीचा प्रयत्न केला आहे. आणि आज देखील दक्षिण युरोपांतील राष्ट्रसमूहाकडील चळवळींकडे नजर फेंकल्यास याच तत्त्वाचा पुरस्कार होत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येईल. यावरून देखील आमच्या वरील विधानास पुष्टीच येते. ज्यावेळीं इंग्रजी अंमल हिंदुस्थानांत सुरू झाला, त्यावेळीं देखील याच महत्त्वाच्या तत्त्वास अनुसरून जेत्या इंग्रजांचें आचरण होतें हें पुढें क्रमानें येणारच आहे. तात्पर्य काय कीं आज प्रत्येक महाराष्ट्रीयानें व्यक्तिगत उन्नतीबरोबर आपल्या मातृभाषेच्या-मराठीच्या-संसाराच्या उन्नतीकडे लक्ष देणें जरूर आहे.

माता आणि मातृभाषा यांची तुलना करून जन्म देणाऱ्या मातेपेक्षां आजन्म व्यवहार चालविण्यास सहाय्यक होणारी मातृभाषाच श्रेष्ठ होय हें तत्त्व आतां प्राथमिक शिक्षण घेणाऱ्या मुलांस देखील कळून चुकलें आहे. पण मातृभूमीपेक्षां देखील मातृभाषाच श्रेष्ठ आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. समजा कीं याक्षिणीच्या कांडीनें उद्यां सकाळींच महाराष्ट्रांतून मराठी भाषा, आणि सर्व मराठी वाङ्मय नष्ट होऊन त्या ठिकाणीं इंग्रजी अथवा फारशी भाषा आणि इंग्रजी अथवा फारशी वाङ्मय यांची स्थापना झाली आहे. नवीन जन्मास येणारीं मुलें अशाच एखाद्या परक्या भाषेंतून अस्पष्टोच्चार करूं लागत आहेत, तरुण पिढी परक्याच भाषेंतून मिळेल तें ज्ञान मिळवीत आहे, आणि वयोवृद्ध माणसें परक्याच भाषेंत वाढून त्याच भाषेचे धडे आपल्या संततीस देत आहेत, तर अशा परिस्थितींत वागत असतां देश तोच असला, तरी तद्देशीयांना “ महाराष्ट्रीय ” असें म्हणतां येईल काय ? परक्या भाषेबरोबर परके इतिहास, परक्या चालीरीती, परकें तत्त्वज्ञान, परकी संस्कृति येऊन आपण सर्वस्वीं परके व स्वतांला पारखे झाल्याशिवाय

कदापि रहाणार नाहीं. म्हणूनच राजकारणांत भाषेला फार महत्त्व प्राप्त होतें. दरबारी पत्रव्यवहार आपल्याच भाषेंत असावा असा जेत्यांचा जितांवर जो अत्याग्रह होतो तो केवळ कामाकाजाच्या सोईसाठींच असेल काय ? याचा विचार प्रत्येकानें आपल्याशींच करून पहावा. प्रांजळपणें बोलावयाचें तर इंग्रजी भाषेचे मराठी भाषेवर फार उपकार झाले आहत हें कबूल करण्यांत कोणालाही कमीपणा वाटण्याचें कारण नाहीं. पण त्याच बरोबर हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे कीं केवळ उपकारांच्या जोरावर योग्य मर्यादा ओलांडून इंग्रजीनें मराठीच्या घरांत फाजील स्तोम माजविण्याचा अतिप्रसंग आणूं नये, व तिला महाराष्ट्रीयांनीं तसा आणूं देतां नये.

मराठीच्या संसारांत कांहीं व्यंगें असतील, असूं द्या. मराठीला डोळे आहेत, बुद्धि आहे, तिला तीं दूर करतां येणार नाहींत असें नाहीं. स्वतंत्र संसार थाटणाऱ्या प्रत्येक भाषेला आरंभीं तशीं व्यंगें असतात म्हणून ती आपलें घर दुसऱ्यांच्या ताब्यांत देत नाहीं, देणार नाहीं. संसार थाटतांना मराठीला कांहीं उपकरणें कमी असतील व असलेलींही कांहीं गंजून गेलीं असतील जाऊं द्या. मराठीचे सुपुत्र मुलुखगिरी करून नवीं उपकरणीं तिला मिळवून देतील व जुनीं घांसून पुसून स्वच्छ करतील. ते अजून स्वाभिमानशून्य नादान बनलेले नाहींत. शिवाय आई व्यवहाराच्या पडद्याआड कपाटांत हरिस्मरण करीत असली तरी ती प्रेमळ आई—संस्कृत—आपल्या कन्येला लागेल तें देण्यास अद्याप समर्थ आहे. मात्र तिच्याकडे धांव घेतली पाहिजे. नव्या जोमानें नवा संसार थाटतांना मराठीला कोणत्याही गोष्टीला डगमगण्याचें बिलकूल कारण नाहीं, हेंच आतां पुढील प्रकरणांमधून विशेष स्पष्टपणें लोकनिदर्शनास आणून द्यावयाचें आहे.

संसार म्हणजे संसार. तो जीवाला सुटत नाहीं. पण उन्नति मंदिराची ती एक पायरी आहे म्हणून त्याचा त्याग करतां येत नाहीं. संसार स्वयमेव सुसंघटित कुठेंही आणि कधींही सांपडावयाचा नाहीं. तो धक्काबुक्कीचा मामला आहे. तो दिसतांना भडक दिसला म्हणून भिण्याचें कारण नाहीं. योग्य उपायांनीं तो भडकपणा फिक्का पाडतां येतो. म्हणूनच श्रीसमर्थ म्हणतात—

**संसार मुळींच नासका । विवेकें करावा नेटका**
**नेटका करितां फिका । होत जातो ॥ १९।१०।२९ ॥**

मराठीच्या संसाराचा इतिहास पाहण्यापूर्वी व भावी परिस्थिति पडताळण्यापूर्वीं वरील ओंवी पूर्णपणें मनांत ठसवून ठेवणें जरूर आहे.

---

# प्रकरण २ रें.

## एका शतकाचा संक्षिप्त इतिहास.

ज्या ज्या भाषेचें वाङ्मय अमूल्य ग्रंथभांडारानें सुसंपन्न झालेलें असेल ती ती भाषा शक्य असेल त्यानें अवश्य शिकावी. असें केल्यास व्यक्तिदृष्ट्या व राष्ट्रदृष्ट्याही फायद्याच आहे. इंग्लिश भाषा आज वैभवाच्या कळसास पोंचलेली आहे. तिचा प्रसार सर्व जगभर झालेला आहे. आणि तिच्यांत ग्रंथभांडारही अपरंपार आहे. अर्थात् इंग्लिश भाषा शिकूं नये असें कोणीही म्हणणार नाहीं. उलटपक्षीं कोणत्याही राष्ट्राच्या शिक्षणप्रणालिकेंत जेव्हां दुसरी भाषा म्हणून परकी भाषा निवडावयाची असेल तेव्हां त्याला इंग्रजी भाषेकडेच वळावें लागेल. म्हणूनच दुसरी परकी भाषा म्हणून महाराष्ट्राच्या उच्च शिक्षणक्रमांत इंग्रजी आवश्यक करून ठेवली तरी हवीच आहे. पण दुय्यम व उच्च शिक्षणक्रमांत व व्यवहारांत तिचा अवास्तव झालेला शिरकाव कोणत्याही देशांत योग्य गणला जाणार नाहीं. सर्वच्या सर्वच शिक्षणक्रम मातृभाषेंतून पुरा होण्याइतकी ज्या भाषेची सुसंपन्नता असेल ती धन्य होय. पण शिक्षणक्रमांत प्रवेश आणि सुसंपन्नता या दोन गोष्टी भाषेच्या प्रगतीच्या बाबतींत परस्परावलंबी आहेत. त्यांतूनही अगोदर काय? या प्रश्नास शिक्षणक्रमांत प्रवेश हेंच उत्तर योग्य ठरतें. पोहावयास शिकावयाचें असेल तर प्रथम

पाण्यांत उतरावेंच लागतें. “ पोहावयास आल्यावर आम्ही पाण्यांत पाय ठेवणार ” असें कोण सुज्ञ माणूस म्हणेल ?

मराठी भाषेला शिक्षणक्रमांतून याच्यापूर्वींच प्रवेश दिला असता तर कदाचित् मराठी भाषेला याच्या पूर्वींच आजच्याहीपेक्षां अधिक संपन्नता आली असती. पण तसें घडलें नाहीं. देशी भाषांविरुद्ध इंग्रजी भाषेच्या उडालेल्या झगड्यांत देशी भाषांना मूग गिळून स्वस्थ बसावें लागलें आणि इंग्रजी भाषेनें हिंदुस्थानच्या अंगणांत आपलें घोडें भरधाव पिटाळलें. अर्थात् त्याला महाराष्ट्रमंदिराच्या परसांत तरी मज्जाव कोण करणार ?

इंग्रजी अमलांतील भरतखंडांतील शिक्षणाच्या प्रगतीचा इतिहास बोधप्रद व मनोरंजक आहे. या प्रकरणांत त्याचें थोडेसें पर्यालोचन झाल्यास आपल्या देशी भाषा मागें कां पडल्या; याचें कारण परस्पर उमगण्या-सारखें आहे.

कंपनीसरकारचें आसन बरेंचसें स्थिरस्थावर झाल्यावर कंपनीचें लक्ष शिक्षणाकडे वेधलें. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, तागडी आणि पोतें याच्या मागोमाग पेटी आणि पोथी आली. ही पेटी औषधांची आणि पोथी बायबलची ! ख्रिस्ती धर्मोपदेशकांनीं हिंदुस्थानांतील शिक्षणाच्या कार्यांत पुष्कळ कामगिरी केली आहे. ज्या ज्या ठिकाणीं ब्रिटिशांचा प्रवेश झाला, त्या त्या ठिकाणीं ख्रिस्ती धर्मोपदेशक जाऊन त्यांनीं आपलें शिक्षणदानाचें कार्य केलें आहे. कंपनीसरकारचे पहिले गव्हर्नर वॉरन हेस्टिंग्स हे होत. यांनीं १७८२ सालीं कलकत्ता येथें एका मुसलमानी शिक्षणसंस्थेला सहाय्य करून शिक्षणदानाच्या कार्याला प्रारंभ केला. या संस्थेच्या संस्थापनेंत हेस्टिंग्ससाहेबांनीं प्रमुख भाग घेतला होता.

नंतर १८१३ सालीं इंडिया ॲक्टांत असें एक कलम घातलें कीं कंपनीच्या डायरेक्टरांनीं शिक्षणकार्यासाठीं दरसाल ठराविक रक्कम खर्च करावी. त्यावेळीं हिंदुस्थानांत पाश्चात्य पद्धतीचें एखादें कॉलेज उघडावें कीं काय असा प्रश्न निघून बराच वादविवाद झाला. पण शेवटीं पाश्चात्य-

पद्धतीचें शिक्षण देण्याच्या भानगडींत न पडता जी पौर्वात्य शिक्षणपद्धति त्या वेळीं या देशांत चालू होती, तिलाच या पैशानें उत्तेजन द्यावें असें ठरलें. ही गोष्ट खरोखर अनपेक्षित व लक्षांत ठेवण्यासारखी आहे. यावरून पाश्चात्य शिक्षणपद्धति हिंदुस्थानांत सुरू करण्याचा राजकर्त्यांचा प्रथमपासूनचाच कृतनिश्चय होता असें दिसत नाहीं. पाश्चात्य शिक्षणपद्धतीचा प्रसार करण्याचें वारें ब्रिटिश सत्तेच्या कानांत एका बाजूनें पाश्चात्य भौतिक शास्त्रांना भुलून तीं आपलेकडे आणण्याच्या कल्पनेनें भाळलेल्या एतद्देशीय सुक्षिक्षितांनीं, व दुसऱ्या बाजूनें ख्रिस्ती धर्माचा प्रसार करणाऱ्या खटपटी मिशनऱ्यांनीं फुंकिलें.

ब्रिटिश सत्तेला प्रथम बंगाल्यांत अवसर मिळाला आणि नंतर तेथून ती मद्रास मुंबईकडे फैलावली. म्हणूनच या शिक्षणपद्धतीला आरंभ प्रथम बंगाल्यांत आणि तदनंतर मद्रास मुंबईकडे झाला. या शिक्षणकार्यांत पुढें पुढें ब्रिटिश अधिकारी देखील लक्ष घालूं लागले हें स्वाभाविकच आहे, मुंबईकडे वयांडी, मोल्स्वर्थ, जार्विस, एल्फिन्स्टन, वुइल्सन प्रभृति लोक पुढें सरसावले. पण त्याच्यापूर्वीं बंगाल्यांत डेविड हेअर, कॅरे, मार्शमन, वार्ड प्रभृति इंग्रजांनीं अग्रेसरत्व पतकारिलें होतें. हल्लींचें श्रीरामपूर कॉलेज हें १८१८ सालीं कॅरेप्रभृति उपरिनिर्दिष्ट शेवटच्या तिघांनीं स्थापिलेल्या शिक्षणसंस्थेचें रूपांतर होय. या त्रिकूटापैकीं " डेविड हेअर यानें आपलें तनमन धन तत्कालीन वंगवासीयांच्या शैक्षणिक व नैतिक उन्नतीसाठीं वेंचिलें" असा उल्लेख त्याच्या थडग्यावरील मृत्युलेखांत आहे. १८०० पासून १८१६ पर्यंत त्यानें आपली कामगिरी अव्याहत सुरू ठेविलेली होती. " चिकाटी म्हणजे मिशनऱ्यांचीच" हें आतां जगप्रसिद्ध झालें आहे. आपलें कार्य सुकर व्हावें म्हणून हेअरनें वंगभाषेचें अध्ययन केलें. परंतु ती भाषा शिकल्यावर त्यांत त्याला आधुनिक कलांवरील ग्रंथांचा दुष्काळ पाहून निराशा वाटली. म्हणून पाश्चात्य वाङ्मय व पाश्चात्य शास्त्रें यांची ओळख करून देण्यासाठीं एक स्वतंत्र संस्था स्थापन करण्याचा त्यानें घाट घातला. त्यांत त्याला

प्रख्यात सुधारक राजा राममोहन रॉय यांचें सहकार्य मिळालें. या दोघांच्या श्रमांचें फळ म्हणजेच १८१७ सालीं स्थापन झालेलें हिंदु कॉलेज होय. या संस्थेचा उद्देशच असा जाहीर करण्यांत आला होता कीं घरंदाज हिंदूंना इंग्लिश व एतद्देशीय भाषा आणि युरोपियन व एशियाटिक वाङ्मय व शास्त्रें यांचें ज्ञान करून द्यावयाचें.

आपल्या मागसलेल्या देशबंधूंच्या हितासाठीं आणि राष्ट्रोन्नतीसाठीं राममोहन रायांची धडपड आयुष्यभर सारखी चालू होती. ज्ञानाचे जे जे मार्ग हिंदुस्थानाला खुले होतील ते ते पतकरून तद्द्वारा मिळेल तेवढें आधुनिक ज्ञान पदरांत घ्यावें अशी तळमळ त्यांना लागन राहिली असतां त्यांच्या ध्यानांत पुढच्या अनिष्ट गोष्टी न येणें स्वाभाविक आहे. परंतु पाश्चिमात्य शिक्षणपद्धतीचें हिंदुस्थानांत बीजारोपण करण्यांत मिशनरी लोकांचा हेतु मात्र निराळाच होता. तो लॉर्ड रोनाल्डशे यांच्याच शब्दांत देणें योग्य होईल.

1 "The missionaries were little behind the secularists in furthering the advance of education on modern lines. Their object was necessarily a different one. *For them education was important in the main as a means of conveying to Indians the teaching of the Christian religion.*"

या गोष्टीचें प्रत्यंतर त्याच वेळीं आलें. कारण त्यांनीं आपले हेतु गुप्त ठेविलेच नव्हते. वरील संस्था स्थापण्याच्या सुमारासच श्रीरामपूर येथें वरील मिशनरी त्रिकूटानें सुमारें तिसांहून जास्त एतद्देशीय भाषांत "नव्या करारा"च्या आवृत्त्या ताबडतोब छापून प्रसिद्ध केल्या. या त्रिकूटास अखेरीस अलेक्झांडर डफ येऊन मिळाल्याबरोबर या चौकडीस आणखी अवसान आलें. राम मोहन रॉय त्यांना सहाय करीत होतेच. त्यामुळेंच स्कॉटिश चर्चचें स्कूल आणि कॉलेज नवीन अस्तित्वांत आलें.

---

१ आधुनिक पद्धतीवर शिक्षणाची प्रगति करण्याच्या बाबतींत मिशनरीही इतर लोकांच्या मागें राहिले नव्हते. परंतु त्यांचा हेतु निराळा होता. हिंदी लोकांना खिस्ती धर्माची शिकवण पाजण्याचें साधन म्हणून त्यांना या शिक्षणाचें महत्त्व वाटत होतें.

इथपर्यंत ठीक झालें. इंग्रजी भाषेचा व पाश्चात्य शास्त्रांचा अभ्यास अजूनही नको असें नाहीं. पण बोधभाषा इंग्रजीच असावी अशी विनंति देखील राजा राम मोहन रॉयनींच केली. त्यांना त्या वेळीं तसें करणें सयुक्तिक वाटलें असेल. पण तोच कित्ता आतांही गिरवावा असें म्हणणें मात्र बरोबर नाहीं. राम मोहननीं पाश्चात्य शास्त्रांचा अभ्यासक्रम इंग्रजी भाषेच्या द्वारां हिंदी विद्यार्थ्यांस शिकविण्याबद्दल एकसारखा आग्रह चालविला. प्यारीचंद्र मित्र यांनीं डेविड हेअरच्या चरित्रांत राम मोहनचें पत्र प्रसिद्ध केलें आहे. त्या पत्रांत राम मोहन लिहितात कीं " संस्कृत पद्धतीनें शिक्षण देणें हें हिंदवासीयांस हितावह होणार नाहीं. त्यामुळें नवीन प्रकाश पडण्याऐवजीं उलटा काळोखच जास्त माजेल ! "

वेदकालापासून चालत व वाढत आलेल्या संस्कृत शास्त्रांचा व ग्रंथभांडाराचा पुरा ठाव घेण्यास त्यावेळीं कोणास सवड झाली नसेल, अथवा पाश्चात्य भौतिक शास्त्रांच्या विद्युत्प्रकाशानें त्या वेळीं एतद्देशीय पुढाऱ्यांचे डोळे दिपून जाऊन त्यांना दुसरें तिसरें कांहींच दिसेनासें झालें असेल; कदाचित् कालाच्या ओघाच्या प्रवाहामुळें तशाच गोष्टी घडून यावयाच्या होत्या म्हणून असेल, पण इंग्रजी माध्यमाच्या तत्त्वाचाच पुरस्कार सारखा होत चालला. १८२३ सालीं जी 'कमिटी ऑफ़ पब्लिक इन्स्ट्रक्शन " निर्माण झाली, तिचें अध्यक्षत्व मेकॉलेसाहेबांस मिळून ते गव्हर्नर जनरलच्या कौन्सिलचे " चेअरमन " १८३३ सालीं झाले आणि पौर्वात्य शास्त्रकलांवर तोंडसुख घेण्यास सुरवात केली. त्यांची विचारसरणी व त्यांनीं केलेली एतद्देशीय भाषांची निंदा लोकविश्रुत आहे. त्यांनीं १८३५ सालीं आपल्या सभासदत्वाच्या खुर्चीवरून लिहून टाकिलें कीं, " युरोपियन लायब्ररीच्या कपाटांतील एखाद्या फळीवरील पुस्तकांत जेवढें कांहीं सांपडेल, तेवढें हिंदुस्थान आणि अरबस्तान या दोन्ही देशांतील सबंध वाङ्मयापेक्षां अधिक किंमतीचें होईल ! "

केवढी ही दर्पोक्ति ! शिक्षणपद्धति अजीबात बदलल्याशिवाय व आपल्या मतांस सरकारी मंजुरी मिळाल्याशिवाय आपण त्या बाबतींत काम करण्यास बिलकूल तयार नाहीं असें या साहेब मजकुरांनीं चक्क लिहून कळविलें.

लॉर्ड ॲाम्हर्स्ट गेले आणि बेंटिंक आले. मेकॅालेसाहेब यांनीं पुष्टि दिली. दरम्यान १८३३ सालींच जरी राम मोहन रॉय यांचा काळ झाला, तरीं त्यांनीं पेरलेल्या बीजास अंकुर फुटूं लागले होते. त्यांचा सांप्रदाय समृद्ध होऊं लागला होता. त्यांच्या अनुयायांत रामतनु लाहिरी हे अग्रेसर होते. हे मेकॅालेसाहेबांस मिळाले. या सर्वांच्या खटपटीनें शिक्षणाकरितां खर्चावयाचा सरकारी पैसा युरोपियन भाषा व शास्त्रें इंग्रजी बोधभाषेच्या द्वारें शिकविण्याच्या कार्यास लावण्याचें ठरलें. रामतनु लाहिरीप्रभृतींनीं " ज्ञानान्वेषण " व " बेंगाल स्पेक्टेटर " हीं नियतकालिकें सुरू केलीं व " सोसायटी फॉर धि ॲक्विझिशन ऑफ् जनरल नॉलेज " नांवाच्या क्लबाचीही स्थापना झाली.

या सर्व चळवळींवरून कोणाच्याही सहज लक्षांत येईल कीं, राम मोहन रॉय काय अथवा रामतनु लाहिरी काय सर्व हिंदी सुधारकांना आपला देश ताबडतोब पुढें यावा, आपल्यांत सर्वांगीण सुधारणा लौकर व्हावी याच सदिच्छेनें प्रेरित करून सारखें तळमळत ठेविलें होतें. देशाची सुधारणा हेंच ध्येय त्यांच्या अंत:करणांत मुरून गेलेलें व त्याचसाठीं त्यांची सारी धडपड चालली होती.

ब्रिटिशांच्या पूर्वीं मोंगलांची राजसत्ता हिंदुस्थानांत होती. त्यांनीं आपल्या फारशी भाषेचें जोखड हिंदुस्थानाच्या मानेवर लादलें होतें, त्यांची राजसत्ता आतां लयास गेली होती. परंतु १८३७ सालीं सरकारदरबारांतून फारशी भाषेस एका कायद्यानें पिटाळून लावण्यांत आलें आणि त्या ठिकाणीं इंग्रजीची प्रतिष्ठापना झाली. आणि १८४४ सालीं तर आंग्ल विद्याविभूषितांसच सरकारी नोकरींत उच्चस्थान मिळावयाचें प्रसिद्धीपत्रक काढल्यामुळें इंग्रजी भाषेची आराधना करण्याचें व्रत हिंदवासीयांनीं स्वीकारलें. आधीं पोट आणि मग ज्ञान अथवा मान. पोटच इंग्रजीच्या ताब्यांत गेल्यावर बाकीच्या गोष्टीही साहजिकच गेल्या. अर्थात् देशी भाषांचा पुरताच कोंडमारा झाला. प्रो. द. वा. पोतदारांच्याच शब्दांत सांगावयाचें म्हणजे " बाहेर मान नाहीं.

व्यवहारांत लाभ नाहीं, सत्कारांत प्रतिष्ठा नाहीं, आश्रय नाहीं, उत्तेजन नाहीं उलट पदरमोड करावी, अपमान सोसावे, असा विपरीत प्रसंग ! " पण हा प्रसंग आजचाच नव्हे, त्या वेळेपासून तों आज तागायत. मग ग्रंथ, त्यांवर टीका, व्याकरणें आणि कोश तयार व्हावे कसे आणि कोणाकरितां ? देशी भाषांची अभिवृद्धि तरी व्हावी कशी ? जो प्रकार बंगाल्यांत तोच महाराष्ट्राच्या मुंबईत. म्हणूनच बंगालकडचा इतिहास थोडासा विस्तृत द्यावा लागत आहे. बंगाल्यांत वंगभाषा मागें पडली तर महाराष्ट्रांत मराठी. परंतु सबंध हिंदुस्थानच्या राज्यकारभाराचीं सूत्रें बंगाल्यांतील कलकत्त्यांतून हालत असल्यामुळें आमच्या भाषांच्या संसाराच्या उडालेल्या बोजवाऱ्याच्या इतिहासाकडे पहावयाचें झाल्यास कलकत्त्यालाच जावें लागतें.

यानंतर शिक्षणाच्या इतिहासांत १८२४, १८५९, १८७१, १८८२, १८९८ व १९१७–१९ हीं सालें महत्त्वाचीं मानावयास हरकत नाहीं. सर चार्लस् वुडसाहेबाच्या 'मेमोरँडम्'नें १८५४ सालाला शिक्षणाच्या इतिहासांत फार महत्त्व आलेलें आहे. वरील घाटत असलेली इंग्रजी भाषेच्या द्वारां पाश्चिमात्य शिक्षणपद्धति या वर्षीं दृढमूल झाली व त्याच धोरणानें त्या पद्धतीची वाढ सालदरसाल आजपर्यंत होत गेली. हिंदुस्थानच्या आर्थिक व सामाजिक परिस्थितीमुळें शिक्षणाचें उच्च ध्येय बाजूस राहिलें, आणि नोकरींत प्रवेश मिळविण्याकरितां अथवा सुशिक्षित म्हणवून घेण्याच्या लालसेनें वरील शिक्षणपद्धतीचा चोहींकडून स्वीकार होऊं लागला. कारण विश्वविद्यालयाची पदवी हीच हिंदी तरुणांच्या महत्त्वाकांक्षेचा विषय बनून राहिली.

2 " The university degree had become the accepted object of ambition, the passport to distinction in the public services, and in the learned professions,"—Report of the Commission of 1882.

---

२ विद्वत्तेच्या जोरावर चालवावयाचे धंदे अथवा नोकरीचाकरी यांत श्रेष्ठ स्थान मिळवावयाचें साधन म्हणून विश्वविद्यालयाची पदवी हा एक महत्वाकांक्षेचा सर्वमान्य विषय झाला होता.

या शिक्षणाचा ओघ एकमुखानें फक्त पुस्तकी ज्ञानाकडे वाहत होता. त्याला धंदेशिक्षण, व्यावहारिक शिक्षण वगैरे उपांगें नव्हतीं. ज्या इंग्रजी भाषेच्या द्वारें शिक्षण संपादन करावयाचें ती इंग्रजी भाषा ज्यांची मातृभाषा आहे अशांच्याकडून पढविण्यांत न येतां ज्यांचें त्या भाषेचें स्वतःचें ज्ञानच तुटपुंजें आहे, अशांकडून शिकविण्यांत येत असल्यामुळें धड स्वभाषाही नाहीं आणि धड परभाषाही नाहीं अशी शोचनीय अवस्था होऊं लागणें अपरिहार्य झालें. या स्थितीला आळा घालण्याकरितां १८८२ सालच्या व १९०२ सालच्या कमिशनांनीं योजलेले उपाय निर्माल्यवत् ठरून केवळ नोकरीकरितां इंग्रजी शिकावयाचें या हेतूनें फुगणारा विद्यार्थीवर्ग दरसाल गणितश्रेढीनें एकसारखा वाढत चालला आहे तो या क्षणापर्यंत.

हिंदुस्थानांतील एका शतकांतील शिक्षणपद्धतीचा त्रोटक इतिहास हा अशा प्रकारचा आहे. ज्यांचा पूर्वेतिहास, परंपरा आणि परिस्थिति अगदीं भिन्न आहे, अशा लोकांनीं स्वमतानुसार एक दिशा आंखून त्या अनुरोधानें हिंदुस्थानांतील विविध धर्मांच्या, विविध परंपरेच्या, विविध ज्ञातींच्या व विविध भाषा बोलणाऱ्या असंख्य लोकांचा शिक्षणक्रम चालविलेला आहे. ही स्थिति अगदीं अस्वाभाविक नव्हे काय ? कोणतेंही एक स्वतंत्र राष्ट्र घ्या. राष्ट्राच्या इतिहासांत उतरती कळा आणि चढती कळा ह्या आळी-पाळीनें यावयाच्याच. अशा प्रकारच्या उतरत्या कळेंत तें स्वतंत्र राष्ट्र सांप-डलेलें आहे आणि दुसऱ्या राष्ट्रांतील परक्या लोकांनीं त्याठिकाणीं आपला अंमल बसविलेला आहे. त्या अवनत राष्ट्रातील तरुणांना किंवा दुय्यम शिक्षण घेऊं इच्छिणारानां त्या परक्या लोकांच्या भाषेंतून ज्ञान ग्रहण करावें लागत आहे. शिवाय खुद्द शिक्षकांनाच ती परकी भाषा अवघड जात असून स्वतः संपादन केलेलें तुटपुंजें भाषाज्ञान ते आपल्या शिष्यांस पढवीत आहेत ! अशा प्रकारें दुय्यम शिक्षण संपल्यावर त्यांना उच्च शिक्षण-क्रमांत शिरावयाचें आहे. आणि तेथें तरी काय ? तर आपला इतिहास, आपली पूर्वपरंपरा, आपल्या चालीरीति, आपली आचारविचारपद्धति व

आपली संस्कृति यांशीं आमूलाग्र विसंगत असलेल्या पद्धतीनें, नवखे विषय, परक्या भाषेंत शिकावयाचे ! त्या अवनत राष्ट्राची अशा परिस्थितींत कितीशी उन्नति होईल ? ही स्थिति अगदीं निसर्गाविरुद्ध नव्हे काय ?

याच्यावर असा आक्षेप येईल कीं अशी स्थिति हिंदुस्थानांत उत्पन्न व्हावयास हिंदी लोकच कारणीभूत झाले. शिवाय देशी भाषांत कोश वगैरे संदर्भ ग्रंथ व इतर शास्त्रकलाविषयक ग्रंथ नसल्यामुळें इंग्रजी भाषा माध्यम म्हणून स्वीकारल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. शिवाय इंग्रजी भाषेचा प्रसार सर्व जगभर झाला असून तिच्यांत वाङ्मयही विपुल आहे. खुद्द हिंदुस्थानांत देखील निरनिराळ्या सभांच्या वेळीं भाषणें होतात तीं इंग्रजींतूनच. आणि आज जी काय हिंदुस्थानांत थोडीबहुत जागृति झालेली दिसत आहे तो तरी इंग्रजी भाषेचाच प्रभाव होय. पाश्चिमात्य भौतिक कलांस तुच्छ मानून भारत देशास जगांत तग काढतां येणें याउप्पर शक्य नाहीं; आणि पाश्चात्य ज्ञानाची ओळख इंग्रजीनेंच करून दिलेली आहे.

या आक्षेपांत सर्वांशीं नसलें तरी बऱ्याच अंशीं सत्य आहे. जातिवंत परधर्मीयांपेक्षां बाटगे परधर्मीयच कुऱ्हाडीचे दांडे बनत असतात. तद्वत् खऱ्या खऱ्या अंतःकरणाच्या कळकळीनें राम मोहनसारख्या सुधारकांनीं इंग्रजीचा प्रवेश भारतमंदिरांत केल्यावर तिला पाठिंबा देणारा व तिचें सर्वस्वीं अनुयायित्व पतकरणारा जो एक " सुशिक्षित ब्रुव " आंग्लविद्याविभूषित वर्ग निर्माण झाला, तो या बाबतींत खुद्द मेकॉलेच्याही पलीकडेच पाऊलभर गेला. मेकॉलेला हिंदी तरुणांस कसें बनवावयाचें होतें ? रक्तानें आणि वर्णानें हिंदी, पण अभिरुचीनें मतांनीं आणि आचारविचारांनीं इंग्लिश असे हिंदी लोक तयार करावयाचे होते. त्यांचे शब्द असे आहेत.

3 " Indian in blood and colour, but English in taste, in opinions, in morals and in intellect ! "

मेकॉलेचा हा हेतु साध्य झाला कीं नाहीं ? झाला असेल तर त्याला तो कोणत्या उपायानें साध्य करतां आला ? बोधभाषेच्या द्वारेंच ना ? शिक्षणक्रमांतील बोधभाषेच्या अंगांत केवढी अद्भुत शक्ति आहे, हें याच एका

गोष्टीवरून सिद्ध होत नाहीं काय ? आणि जर आपणाला आपली खरीखुरी उन्नति साधावयाची असेल तर ती मातृभाषेला बोधभाषेचें स्थान देऊनच साधतां येणार हेंही तितकेंच स्पष्ट होत नाहीं काय ?

ही पद्धति स्वीकारण्याचा आपला उद्देश मेकॉलेनें स्वतःच लिहून ठेवला आहे कीं, या पद्धतीनें सुशिक्षित झालेले हिंदी लोक आपापल्या मातृभाषा संपन्न करण्यास समर्थ होतील. ते नवीन नवीन शास्त्रीय शब्द व परिभाषा तयार करतील, आणि मग ते आपल्या अशिक्षित अज्ञ बांधवांसही शिक्षणामृत पाजतील.

तेव्हां मेकॉलेची अपेक्षा अशी द्विविध होती. त्यांपैकीं कोणती अधिक खरी ठरली ? त्या अपेक्षेचा पहिला भाग दुसऱ्या भागापेक्षां अधिक खरा ठरला. दिपून गेलेल्या दृष्टीच्या चकमुलींत सर्वच परकें चांगलें वाटूं लागलें. त्यामुळें सगळीच दिशाभूल होऊन गेली. परंतु आडवाटेंत सांपडून ठेंचा-ठोकरा बसूं लागल्या. तसतसे डोळे निवळूं लागले. हाही प्रकार बंगाल्यांत आणि महाराष्ट्रांत सारखाच झाला. कारण मातृभाषेचें महत्त्व पटून बंगाल्यांत जसे गंगाधर भट्टाचारजी, ईश्वरचंद्र गुप्त, ईश्वरचंद्र विद्यासागर निर्माण झाले व त्यांनीं मातृभाषेचा उद्धार करावयास कंबर कसली, तसेच महाराष्ट्रांत चिपळूणकर पितापुत्र, छत्रे, रानडे वगैरे मंडळी पुढें सरसावली. यांनीं केलेल्या लोकजागृतीमुळें व प्रयत्नांमुळें पुनः स्वत्वभावना उदय पावूं लागली आहे. सुधारणेच्या कार्यांत स्वत्व राखून चांगलें तेवढें परकीय ग्रहण करण्याची दूरदृष्टि ठेवली पाहिजे.

---

# प्रकरण ३ रें.

## भाषा आणि पाठांतर.

आधुनिक शिक्षणपद्धतीविषयीं लिहितांना इमर्सन एके ठिकाणीं म्हणतो—

* "We are students of words. We are shut up in schools and colleges and recition rooms for ten or fifteen years and come out at last with a bag of wind, a memory of words, and do not know a thing !"

आपण नुसते शब्दघोके आहोंत. वयाचीं दहापंधरा वर्षे शाळा, कॉलेज आणि पाठांतराच्या खोलींत उभे राहून शेवटीं पाठीवर वाऱ्याची मोट—शब्दांची स्मृति— घेऊन बाहेर पडतों ! खरें ज्ञान लवमात्रही नाहीं !

ज्यांची शिक्षणपद्धति आपणाला आदर्शवत् वाटते त्यांच्यांतील तत्त्ववेत्त्यांचे हे उद्गार. शिवाय यांचें शिक्षण मातृभाषेंतून झालेलें आहे. तरी देखील यांची मनोदेवता यांना असे उद्गार काढावयास लावते. यांना सर्व परिस्थिति पूर्णपणें अनुकूल असतांनाही यांची अशी दशा. मग पूर्वींच्या प्रकरणांत लिहिल्याप्रमाणें ज्यांना मातृभाषेंतून शिक्षण मिळत नाहीं, बोंडल्यानें दूध प्यावें लागत आहे, आणि ज्यांना सर्वस्वीं प्रतिकूल परिस्थितीशीं अहर्निश झगडावें लागत आहे, त्यांची दशा कोणत्या शब्दांनीं वर्णन करावयाची ?

केवळ परीक्षेंतून उत्तीर्ण होण्याकरितां ठराविक प्रमाणांत मार्क मिळावे म्हणून कोणताही विषय समजो अगर न समजो तो तोंडपाठ करण्याकडेच विद्यार्थ्याचा कल असतो. यांत त्याचा तरी बिचाऱ्याचा दोष कसा मानावा ?

---

* आम्ही फक्त शब्दांचा अभ्यास करितो. शाळांत, कॉलेजांत, पाठशाळांत दहा—पंधरा वर्षें आम्ही कोंडून घेतों आणि शेवटीं वाऱ्याचो मोट—पदार्थांचें ज्ञान नव्हे, तर नुसत्या शब्दांची आठवण—बरोबर घेऊन बाहेर पडतों !

असें असूनहि हा दोष विद्यार्थ्यांची नालायकी म्हणून शिक्षणपरिस्थितीची पहाणी करणाऱ्या कमिशनाकडून पुढें आणण्यांत येत असतो. पण तो दूर करण्याची खरी उपाययोजना सुचविली कां जाऊं नये ?

एखादा विषय पाठ करणें अगर न करणें हा दोष अगर गुण मानावयाचें झाल्यास इतर अनेक बाबींचा विचार करावा लागेल. अर्थ न समजतां केलेलें नुसतें यांत्रिक पाठांतर केव्हांही त्याज्यच मानावें लागेल. परंतु अर्थ समजल्यानंतर स्मरणशक्तीला सहाय्यभूत म्हणून पाठांतर करणें उपकारक होत असतें. वेदकालापासून तों काल परवांपर्यंत सांप्रदायिक अथवा परंपरागत ज्ञान पाठांतरानेंच चालत आलेलें आहे. त्याला मुद्रणकलेचा अभाव, कांहीं विवक्षित विषय विवक्षित कुलपरंपरेमध्येंच राखून ठेवण्याचें ध्येय वगैरे अनेक कारणें असूं शकतील. या पिढीजाद संस्कारामुळें पाठांतराकडे हिंदी मुलांचा साधारणपणें कल असणें साहजिक आहे. पण हें पाठांतर निदान परकी भाषेंतून होत नसे. या पाठांतराचा अजीबात अर्थच कळला नाहीं असें सहसा होत नसे. पुरोहित वर्गांत अज्ञान माजूं लागतांच मात्र तसा प्रकार पुढें थोडाथोडा सुरू झाला. पण त्याला तरी कारण हेंच कीं संस्कृत भाषेचा गौरव होईनासा झाला. अर्थ समजून केलेलें पाठांतर उपकारक होत असतें ह्या म्हणण्याला पुरावे द्यावयास नकोत. कारण अद्याप देखील शाळांतून कविता वगैरे पाठ म्हणून ज्या घेतात, त्या स्मरणशक्तीची वाढ व्हावी म्हणूनच. पाठांतराच्या विरुद्ध हल्लीं जो गवगवा होत असतो त्याचा परिणाम दूरवर झाल्यास तें बरोबर होणार नाहीं, अशी भीति जाणत्या लोकांस पडणें साहजिक आहे. वुइल्यम जेम्स आपल्या Talks to Teachers या पुस्तकांत म्हणतात,—

5 "The older Pedagogic method of learning things by rote, and reciting them parrotlike in the school-room, rested on the truth that a thing merely read or heard, and never verbally reproduced, contracts the weakest possible adhesion in the mind. Verbal recitation or reproduction

is thus a highly important kind of reactive behaviour on our impressions; and it is to be feared that, in the reaction against the old parrotrecitations as the beginning and end of instruction, the extreme value of verbal recitation as an element of complete training may now-a-days be too much forgotten.

वरील उताऱ्यांत पाठांतराच्या सवयीचा केलेला उल्लेख आमच्या लोकांस उद्देशून नाहीं. अर्थात ज्या केंब्रिजच्या शिक्षकवर्गास उद्देशून हे उद्गार जेम्ससाहेबांनीं काढलेले आहेत, त्यांच्यामध्यें देखील ही पाठांतराची सवय होती व ती योग्य मर्यादेंत असली पाहिजे असें सिद्ध व होतें.

असें असतां हिंदुस्थानांतील शिक्षणपद्धतीवर लिहितांना अगर बोलतांना परंपरागत पाठांतराच्या संवयीचा उपहास करण्यांत येतो हें मात्र मोठें नवल आहे. आजकालचें नाइलाजास्तव परभाषेंतून शिकावयाच्या विषयाचें परीक्षेपुरतें केलेलें अर्थहीन पाठांतर यालाच खरोखर " पोपटपंची " हें नांव सार्थ होईल; आणि असलें पाठांतर सर्वतोपरी अनिष्ट अतएव त्याज्य समजलें पाहिजे. असल्या पाठांतरानें शब्दबोंके पदवीधर तयार होतात. ज्ञानाचा लवलेशही नसतो. शब्दज्ञान मात्र पास होण्यापुरतें पदराला असतें, पण शिक्षणाचा अर्थ हा नव्हे. तर मग शिक्षणांत पाठांतराची—अर्थहीन पोपटपंचीची— ही पद्धत रूढ कशी व कां झाली ? खुद्द लॉर्ड रोनाल्डशे साहेबच म्हणतात कीं—

५ शाळेंत विषय पोपटासारखे म्हणून घेण्याची व ते मुखोद्गत करण्याची जी जुनी शिक्षणपद्धति होती तिलाही एका तत्वाचा आधार आहे. तें तत्त्व असें कीं एकवार विषय नुसता वाचला अगर ऐकला, पण तो जर पुन्हां कधींच तोंडानें म्हटला नाहीं, तर मनावर त्याचा टिकाऊ ठसा उमटत नाहीं. तेव्हां मनावर ठसे उमटायला तोंडपाठ म्हणणें अथवा विषय पुन्हा उच्चारणें ही एक परिणामकारी पद्धति आहे. विषय मुखोद्गत करण्यांतच शिक्षणाचें ध्येय—सर्वस्व मानणाऱ्या जुन्या पद्धतीची प्रतिक्रिया जी सुरू झाली आहे, तिच्यामुळें विषयज्ञानाला परिपूर्णता आणणारें जें शब्दांचें पुनरुच्चारण त्याची पूर्ण विस्मृति पडेल कीं काय अशी भीति वाटते.

6 " The use of a foreign tongue as the medium of instruction is attended with obvious drawbacks, of which one sees many examples."

परभाषेला जर बोधभाषेचें स्थान मिळालें तर त्यापासून होणाऱ्या तोटयांचे दाखले कोणालाही हवे तितके दिसून येतील. उदाहरणार्थ त्यांपैकीं एकच घेऊं. एखादा विषय शिकून लक्षांत ठेवण्यास स्वभाषेंतून जितका वेळ लागेल, त्याच्या किती तरी पटीनें जास्त परभाषेंतून शिकावयास लागतो. ज्या भाषेंत तो लिहावयाचा त्या भाषेचें भरपूर ज्ञान नसल्यास त्यांत लिहिण्याच्या चुका होऊन विषयाचें ज्ञान असूनही निरर्थक होतें. अर्थात् त्या विषयाच्या अध्ययनाला गौणत्व येऊन परभाषेलाच प्राधान्य येतें. सगळ्याच विषयांला हा नियम लागू पडल्यामुळें अध्ययनाचे विषयही कच्चे व परभाषेचें ज्ञानही कच्चेंच राहतें. तरी देखील बिचारा विद्यार्थी केवळ परभाषेला इतर कोणत्याही विषयापेक्षां जास्त वेळ देत असतो, तो निराळाच ! साहेब मजकूर म्हणतात.—

7 The Indian boy often devotes as much as twenty six hours a week to a study of English, *a greater portion of time*, as was pointed out by the members of the Calcutta University Commission, *than is allotted to any single subject in any secondary system in any country with which they were acquainted.*

आणि इतकें करूनही जर यश मिळालें नाहीं, तर घोकंपट्टीशिवाय दुसरा कोणता मार्ग राहणार ? प्रस्तुत लेखकाला तर असे कांहीं विद्यार्थी माहीत आहेत कीं, जे भूमिति पाठ करून परीक्षेला पास होतात ! भूमितीचे सिद्धांत अथपासून इतिपर्यंत नुसते तोंडपाठ करावयाचे ! त्यांना

---

७ हिंदुस्थानांतील विद्यार्थी इंग्लिश भाषेच्या अभ्यासांत आठवड्यांतून २६ तास खर्ची घालतो. कलकत्ता युनिव्हर्सिटी कमिशनच्या सभासदांनीं आपल्या रिपोर्टांत म्हटल्याप्रमाणें हा कालावधि, सभासदांना माहित असलेल्या कोणत्याही देशांतील दुय्यम शिक्षणप्रणालींमध्यें कोणत्याही एका विषयासाठीं एका विद्यार्थ्याला खर्च करण्यास लागणाऱ्या कालावधिपेक्षां अधिक आहे.

लागणारीं प्रत्यक्षप्रमाणें व गृहीत कृत्यें सारें तोंडपाठ ! त्यांतील कृतींचा अगर स्पष्टीकरणाचा अर्थ कळेल तर शपथ ! ही आपत्ति कशामुळें ओढवते ? प्रथम—परकी—भाषा, नंतर त्या भाषेंतील खुब्या आणि नंतर विषयाचें ज्ञान. इंग्रजीभाषेच्या द्वारें ज्ञान प्राप्त झाल्यावर प्रांतिक भाषा आपो-आप वर येऊं लागतील या उद्देशानें जरी मेकॉलेसाहेबांनीं ही पद्धत अमलांत आणिली, तरी आजतागायत स्थिति काय आहे ? रोनाल्डशे स्वमुखानें सांगतात,—

8 "Yet for many years still was the child from the Indian countryside, who aspired to a High School education, to spend hour after hour, in puzzled study of the English idiom, that might have been spent to so much greater advantage in learning, in the medium of expression natural to him, not to memorise but to think."

वाचकांना ह्या उताऱ्यांचा मारा असह्य होऊन ते कंटाळूं लागतील अशी भीति वाटते. पण मातृभाषेची शिक्षणांत आवश्यकता प्रस्थापित करतांना आमच्या मतास जितके आधार मिळतील तितके देणें आवश्यक आहे. शिवाय ज्यांना आपण आजवर गुरुस्थानीं मानीत आलों आहोंत त्यांचींच या विषयावरील मतें वाचकांसमोर ठेवल्यास तीं आमच्या मतांहून विशेष ग्राह्य होणार आहेत. याचसाठीं पूर्वीं दिलेले व पुढें देण्यांत यावयाचे उतारे देणें अपरिहार्य होत आहे.

देशी भाषांची खच्ची करून परकी भाषेंतून शिक्षण देण्याच्या योजनेचा पुरस्कार पहिल्या प्रथम ज्या वंगदेशानें केला, त्याच प्रांतांत या योजनेला

---

८ तथापि अजूनही कित्येक वर्षें हायस्कूलमधील शिक्षण घेऊं इच्छिणाऱ्या हिंदुस्थानांतील मुलांस इंग्लिश भाषेंतील सांप्रदायिक वाक्यांचा गुंतागुंतीचा अभ्यास करण्यांत तासचे तास घालवावे लागत असत. शिक्षणाचें माध्यम त्याची जन्मभाषाच असती, तर हाच वेळ त्याला स्मरणाच्या ऐवजीं अधिक फायदेशीर अशा मननांत घालवितां आला असता.

प्रतिकार करण्याचा प्रयत्न प्रथम सुरू झाला ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. हातून चूक घडली तरी हरकत नाहीं, ती चूक आहे असें लक्षांत येतांच सुधारणा करण्यांत शहाणपणा आहे. १९२७ सालीं कलकत्ता युनिव्हर्सिटी कमिशनसमोर झालेल्या साक्षींत मातृभाषा माध्यम व्हावी या तत्त्वाचा अंगीकार केला गेला ही गोष्ट महत्त्वाची आहे. मातृभाषेचा कैवार घेणाऱ्यांची संख्या मात्र थोडीच निघाली आणि बहुमत विरूद्ध गेलें हें शोचनीय होय. पण या मातृभाषेच्या अल्पसंख्याक कैवाऱ्यांनीं देखील नमूद करून ठेवलेल्या मताचाच आतां विजय होत असून त्याचाच फैलाव यापुढें होत जाणें इष्ट आहे. तें मत असें—

9 "The forcing of an alien language only serves to dry up, at their very sources, the very fountain springs of national power and thus impoverishes the nation on the side of initiative and originality."

अशा प्रकारें तोंड होरपळल्यावर शहाण्या झालेल्या लोकांच्या मताचा वारा बदलूं लागतां लागतां १९२२ सालीं कलकत्ता युनिव्हर्सिटीनें मातृभाषेला बोध भाषेच्या दर्जाला चढवितांच जिकडे तिकडे आनंदी आनंद उडून गेला व ती योजना फार लोकप्रिय झाली.

देशी भाषांविरूद्ध परकी भाषेच्या या झगड्यांत राजा राममोहन रॉय यांचा पूर्वीं वारंवार उल्लेख करण्यांत आलेला आहे. त्यांनीं प्रचलित पद्धती सुरू करण्यांत स्वतः पुढाकार घेतला होता व उत्तम संस्कृतज्ञ असूनहि त्यांनींच स्वतः लॉर्ड ॲम्हर्स्ट यांना लिहिलेल्या पत्रांत " संस्कृत भाषा चांगली शिकावयास एक जन्मही पुरा पडणार नाहीं."

10 ( " Sanskrit is so difficult that almost a life time is necessary for its acquisition " )

असें विधान केलें होतें. या त्यांच्या एकंदर धोरणाबद्दल कुणालाही आश्चर्य वाटेल. पण त्यावेळच्या परिस्थितीवरून व त्यांच्या विचारसरणीवरून

---

९ परभाषेचें जूं मानेवर लादलें गेल्यानें राष्ट्रशक्तीचे झरे मूळ उगमापाशींच आटून कोरडे ठणठणीत होतात व राष्ट्राच्या बुद्धीच्या अस्सलपणाचें दिवाळें वाजतें.

१० संस्कृत भाषा इतकी अवघड आहे कीं ती संपादन करावयास जवळ जवळ सारें आयुष्य खर्चावें लागेल.

पाहतां त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं, हें फिरून एकवार वाचकांना स्पष्ट करून सांगितल्याशिवाय राहवत नाहीं. ज्यांना राम मोहन रॉय यांच्या चारित्राची ओळख आहे त्यांना त्यांच्याविषयीं कांहीं जास्त सांगावयास नकोच. ते देशकल्याणेच्छु असले तरी त्यांची दृष्टि फार व्यापक होत चालली होती. राष्ट्रप्रेमावरून विश्वप्रेमाकडे ते झुकूं लागले होते. पुनर्जन्माच्या कल्पनेवर त्यांचा विश्वास होता. ते खरे कर्मयोगीही होते. कदाचित् आपला पुढील जन्म दुसऱ्या एखाद्या भूमींत होणेंही शक्य आहे, असेंही त्यांस वाटत असावें. सर जॉन वुड्रॉफ यांच्या शब्दांत सांगावयाचें झाल्यास—

11 " National egoism was also unknown to him. His mastering idea was to secure the general good and happiness of his people and as a part of it the political advantages and social comforts of the West. For he was a rejoicer in the good fortune of all nations and was free from selfish and vaunting pride in his own race."

राष्ट्रहिताच्याहूनहि त्यांची दृष्टी अधिक व्यापक होऊन ती अखिल जगाच्या हिताकडे डोकावूं लागली होती. ही गोष्ट ध्यानीं घेतल्यास त्यांच्या वर्तनाबद्दल आपणाला अचंबा वाटणार नाहीं. त्यांच्या वर्तनामुळें देशी भाषांना ठोकर बसली खरी, पण त्यांचें वर्तन विवेकबुद्धीला धरून व सद्धेतुमूलक होतें. पण तें तसें असलें म्हणून जो परिणाम व्हावयाचा तो कसा चुकणार ? तो व्हावयाचा तसा झालाच, आणि घोकंपट्टीकडे—शाब्दिक पोपटपंचीकडे—विद्यार्थ्यांचा कल झुकूं लागला. शिक्षणक्रम पुरा पार पाडून देखील शिक्षिताचें ज्ञान म्हणजे नुसता पाण्यावरचा बुडबुडा ठरण्यांत या पद्धतीचें पर्यवसान झालें.

---

११ त्यांना राष्ट्राभिमानाची देखील ओळख नव्हती. आपल्या देशबंधूंचें सुख व सर्वसाधारण हित साधणें व त्याचाच एक अंश म्हणून पाश्चिमात्यांच्या धर्तीवर कांहींशी राजकीय सत्ता व सामाजिक सुखसोयी मिळविणें ही त्यांची मुख्य कल्पना होती. सर्व राष्ट्रें संपन्नावस्थेंत पाहून त्यांना आनंद वाटे व आपल्याच राष्ट्राबद्दल स्वार्थी व पोकळ घमेंड मिरविण्यापासून ते अलिप्त होते.

# प्रकरण ४ थें.

## मातृभाषेचें महत्त्व.

आतांपर्यंतच्या विवेचनावरून मातृभाषेची आवश्यकता व महत्त्व शिक्षणक्रमांत किती आहे, याची कल्पना होणें कठीण नाहीं. तथापि आणखी एक दृष्टीनें मातृभाषेच्या आवश्यकतेचा विचार करावयाचा आहे.

शिक्षणाचें ध्येय काय असावें ? हा तो प्रश्न आहे. वास्तविक शिक्षणाच्या ध्येयाबद्दल मतभेद असावाच कां ? असें वाटणें साहजिक आहे. पण तो आहे यांत शंका नाहीं आणि त्याला प्रमुख कारण संस्कृति–भिन्नत्व हेंच होय. पाश्चात्य राष्ट्रें आणि हिंदुस्थान यांच्या संस्कृतीमध्येंच मुळांतच फरक आहे. पाश्चात्य राष्ट्रांचा भौतिकत्वाकडे ओढा फार, तर हिंदुस्थानाला आध्यात्मिकता अधिक प्रिय वाटते. अर्थात् दोघांचीही एकेक बाजू लंगडी आहे. या उण्या अंगांकडे दोघांचेंही आतां हळूहळू लक्ष वेधूं लागलें आहे. अर्थात् दोघांनाही आपलें गमावूं न देतां दुसऱ्याकडून थोडथोडें घ्यावयाचें आहे. या दृष्टीनें पाहतां पाश्चात्यांपासून आपण भौतिक शास्त्रें व कला शिकत असतां आपल्या आध्यात्मिक ज्ञानाच्या अभ्यासांवर पाणी सोडून चालावयाचें नाहीं

जीवाला शरीर व आत्मा, जीवनाला प्रवृत्ति आणि निवृत्ति, तशीच जीविताला भौतिक आणि आत्मिक अशा दोन बाजू आहेत. या दोन अंगांचा विकास सम प्रमाणांत झाला तरच जीवित्वाचा खरा विकास होईल. जो नियम जीवाला तोच समाजाला आणि राष्ट्राला. तथापि आत्म्याची शक्ति शरीरावर चालत असल्यामुळें विषमता झालीच, तर ती आत्म्याच्या विकासाकडे–जास्ती विकास करण्याकडे–झाल्यास एकवार चालेल. पाश्चात्य राष्ट्रांचा कल भौतिकाकडे अधिक असल्यामुळें त्यांचीं ध्येयें देखील तद्नुरूप अशींच आहेत. पाश्चात्य देशांत अमेरिका, इंग्लंड, जर्मनी हीं प्रमुख राष्ट्रें

आहेत. जर्मनीमध्यें उच्च शिक्षणाचें ध्येय काय मानलें जातें ? तर विद्यार्थ्याला नवीन शास्त्रीय शोध लावण्याचें एक यंत्र बनविणें हें. त्या विद्यार्थ्यांनीं विशिष्ट शाखांचें अध्ययन करावयाचें तें देखील त्या त्या विशिष्ट शाखेंत नवीन संशोधन करण्यासाठींच करावयाचें असतें. अध्यापकानें थोड्याशा मार्गदर्शक सूचना केल्यावर त्या मार्गानें पुष्कळ पुढें जाऊन, इतर सांधनसामग्रीचा भरपूर उपयोग करून घेऊन व स्वतःची बुद्धि लढवून शास्त्रीय शोधांत भर घालणें हेंच एक ध्येय जर्मन विद्यार्थ्यांचें असतें. म्हणून जर्मन राष्ट्र यांत्रिक कारागिरीचें आगर बनलें.

इंग्लिश लोकांचा पायंडा जवळ जवळ तोच. जगांतील धक्काबुक्कीच्या मामल्यांत दोन घेत, चार देत, युक्तिप्रयुक्तीनें मार्ग काढीत पुढें जाणें हाच त्यांचा हेतु असतो. अमुक एक प्रकारची आपत्ति उद्भवली तर त्या प्रसंगीं कसें वागावयाचें याची योजना अगाऊच करून ठेवणें, क्रियेला प्रतिक्रियेनें जशास तसें उत्तर देणें, अशा कांहीं गोष्टी इंग्रजाच्या शिक्षणाचें साध्य म्हणून सांगतां येतील. अमेरिका ही जर्मन, इंग्रज यांच्या कल्पनांचें संमिश्रण म्हणावयास हरकत नाहीं. एवंच काय कीं, या सर्वांचा भौतिकतेकडेच फार ओढा आहे.

परंतु आपली कल्पना यांच्याहून भिन्न आहे. केवळ शरीराचें पोषण एवढेंच आपलें ध्येय नाहीं. आपलें शिक्षणाचें ध्येय निराळें आहे. आणि तें ध्येय आपला धर्म, आपली संस्कृति व आपल्या धार्मिक परंपरा यांना अनुसरून आहे. आपली आश्रमव्यवस्था या शिक्षणाच्या ध्येयाला सुसंगत अशीच आहे व त्या आश्रमव्यवस्थेवरून आपल्या शिक्षणाच्या ध्येयाचा उलगडा होतो. प्रवृत्ति व निवृत्ति यांचा समतोलपणा त्याच्यांत ठेवलेला आहे. या सर्व गोष्टींवरून विशिष्ट ध्येयाकडे विशिष्ट राष्ट्रांचा नैसर्गिक ओढा असतो व तदनुरूप त्यांची शिक्षणपद्धति असते, आणि त्याप्रमाणें त्यांची परंपरा चालू राहते. अर्थात् अशा एखाद्या विशिष्ट परंपरेच्या राष्ट्राची सत्ता दुसऱ्या एखाद्या निराळ्या परंपरेच्या राष्ट्रावर झाल्यास सत्ताधारी राष्ट्र आपल्या पर-

परेला अनुसरूनच अंकित राष्ट्राला वागविण्याचा प्रयत्न करणार हें उघड आहे व त्यांत त्याचा म्हणण्यासारखा दोषही नाहीं. कारण अंकित राष्ट्राची परंपरा कितीही उज्ज्वल असली तरी तिची माहितीच जर सत्ताधारी राष्ट्राला नसली तर तें तरी काय करणार ? यावरून निष्कर्ष निघतो तो असा कीं, ज्या त्या राष्ट्रानें आपली शिक्षणप्रणाली आपल्या संस्कृतीस व परंपरेस धरून आपली आपणच ठरवावी हें उचित होय. कारण एका परंपरेचा शिक्षक आणि दुसऱ्या परंपरेचा शिष्य यांची नीट संगति कधींही जुळावयाची नाहीं. आपल्या प्रकृतीला मानवणाऱ्या कोणत्या गोष्टी आहेत हें ज्याचें त्यालाच पूर्वानुभवानें समजत असतें. **शरीर आणि मन यांचा योग्य प्रमाणांत विकास हें शिक्षणाचें ध्येय सर्वमान्य ठरण्यास हरकत नाहीं.** आपल्या शरीराच्या व मनाच्या विकासाला योग्य असेंच शिक्षण आपणाला आंखावयाचें असतें. परंतु पाश्चात्य ज्ञानाच्या विद्युत्प्रकाशांत दिपून गेल्यानें, पाश्चात्य व पौर्वात्य संस्कृतीच्या पहिल्याच भेटींत भारतीय लोक स्वतःच्या अखंड तेवत राहणाऱ्या व जगाला आदर्शभूत होणाऱ्या ज्ञानदीपाला विसरून गेले व विद्युत्प्रकाशाची चंचलता व क्षणिकता अनुभवास येतांच आपल्याच हातानें मालवून टाकलेला उज्ज्वल दीपक पुनः पेटविण्याच्या प्रयत्नास लागले आहेत !

तथापि या दोन संस्कृतींच्या झगड्यांत आपल्याच लोकांची दिशाभूल झाल्यामुळें परकी संस्कृतीचा विजय होऊन ती आपल्यावर लादली गेली. आणि म्हणूनच मातृभाषेला तुच्छ लेखून तत्कालीन भारतीयांनीं परकी भाषेला आपल्या घरांत सत्ताधीश बनविलें. अर्थात् मातृभाषेला आपलें चंबूगवाळें घेऊन एका कोपऱ्यांत बसावें लागलें. सैंपाकघरांत, दिवाणखान्यांत आणि ओट्यावर परकी बाईच आपला अंमल चालवूं लागली. याचा परिणाम किती अनिष्ट होतो, हें सर जॉन वुड्राफच्याच शब्दांनीं सांगणें बरें.

12 " A People who abandon or who are compelled to abandon their language for that of another, lose themselves. Language is the means by which cultural ideas

are expressed and handed on. There are certain ideas and feelings which can be expressed by particular languages alone. Thus it is not easy to write metapysics in Latin; whereas Greek and Sanskrit are highly efficient for this purpose. There are many terms in Sanskrit for which it is impossible to find an adequate English translation. In short only a race's own language can express its soul. Those who speak a foreign tongue will tend to think foreign thoughts; those who think in foreign thoughts will have foreign aims and tend to adopt foreign ways and so forth. For these reasons dominant peoples have sought to impose their language on subject races as the completion of their conquest."

या उताऱ्यावरून मातृभाषेचें महत्त्व किती व तिच्या अवहेलनेपासून होणारे तोटे किती आहेत याची कल्पना येण्यासारखी आहे. स्वतःची भाषा गमावल्यापासून कोणती अनर्थपरंपरा ओढवते याचें यथातथ्य वर्णन वरील उताऱ्यांत आहे. शिवाय पुढील प्रकरणांत येणाऱ्या मुद्द्यालाही वरील उता-

१२ जे लोक स्वखुषीनें अथवा जबरदस्तीमुळें स्वभाषेचा त्याग करतात ते आत्मघात करून घेतात. स्वसंस्कृतीच्या कल्पना व्यक्त करण्याचें व त्या परंपरेनें चालू ठेवण्याचें स्वभाषा हेंच साधन आहे. अशा कांहीं विशिष्ट कल्पना व भावना असतात कीं त्या विशिष्ट भाषाद्वारेंच व्यक्त करणें शक्य असतें. उदाहरणार्थ, अध्यात्मशास्त्र लॅटिन भाषेंत लिहिणें दुर्घट आहे, पण तेंच ग्रीक अथवा संस्कृत भाषेंत लिहिणें फार सुगम आहे. संस्कृत भाषेंत अशा कांहीं उक्ति आहेत कीं त्या इंग्रजींत भाषांतरित होणें केवळ अशक्य आहे. सारांश राष्ट्राचा आत्मा त्याच्या भाषेंतून व्यक्त होत असतो. जे परकी भाषेंत बोलतात त्यांचा परकीय विचाराकडे कल वाहूं लागतो. परकीय विचारांचीं ध्येयें डोळ्यांसमोर येतात आणि शेवटीं त्या ध्येयांचीं साधनेंही परकीय अशींच पतकरावीं लागतात असें हें राहाटगाडगें चालू होतें. याचसाठीं आपल्या जयाला परिपूर्णता आणण्यासाठीं म्हणून जेते लोक जित लोकांवर आपल्या भाषेचें जोखडही लादण्याचा प्रयत्न करीत असतात.

ऱ्यानें विशेष पुष्टी मिळणार आहे. वरील उताऱ्यांत कांहीं विवक्षित भाषांत विवक्षित विषयाला साजेसा शब्दसंग्रह असतो असें म्हटलें असून त्यांतील प्रमुख अशा दोनतीन भाषांचाच उल्लेख केला आहे. ग्रीक व लॅटिन बरोबर फक्त संस्कृत भाषेचाच नामोच्चार जरी झालेला असला, तरी नदींत असलेलेंच पाणी जसें कालव्यांतून दूरवर जात असतें, तसेंच वर उल्लेखिलेल्या प्रमुख भाषांतील शब्दभांडार त्या त्या प्रमुख भाषांपासून उद्भवलेल्या भाषांमध्यें ओघानेंच उतरणार हें सिद्धच झालें. अर्थात् जे गुण संस्कृत भाषेमध्यें असतील तेच गुण अंशतः संस्कृतोद्भव भाषा जी मराठी, तिच्यामध्यें उतरणार. तथापि ह्या उपभाषांचा ग्रंथविस्तार जसजसा वाढत जाईल तसतशी ती संपन्न होऊन तिच्यामध्यें परंपरागत विशिष्ट शब्दसंग्रहाव्यतिरिक्त इतर विषयांतील तत्वार्थबोधकताही येऊं लागते. आतां ज्या संस्कृत वापींतील उदक मराठीच्या पोहऱ्यानें पहिल्यानें काढलें आहे, त्या मूळ संस्कृतमध्येंच कोणकोणत्या प्रकारच्या ग्रंथांची भरती होती हें पाहिलें असतां संस्कृताच्या व तदनंतर तद्भव अशा मराठीच्हा सामर्थ्याची कल्पना अजमावतां येईल. परंतु हा विषय स्वतंत्र असून त्याचा विचार पुढील प्रकरणांत व्हावयाचा आहे. आपली भाषा सोडून देणें हें किती हानिकारक आहे याचाच विचार या प्रकरणांत मुख्यत्वेंकरून करावयाचा आहे.

आतांपर्यंत ज्या ज्या लोकांचे आधार आपण विषयाच्या मांडणीकरितां घेतले, ते मुद्दामच परकी लोकांचे घेतले आहेत. कारण आपल्या लोकांच्या ठिकाणीं स्वतःच्या भाषेबद्दल पक्षपातित्व असणार असेंच कोणालाही वाटेल. आतांपर्यंतच्या इतिहासावरून पाहतां पक्षपातित्वाची वरील समजूत भ्रममूलकच ठरेल. कारण देशी भाषेच्या विरुद्ध आपलेच लोक गेलेले आहेत. असें जरी असलें तरी देखील आपल्यांतील जगद्वंद्य झालेले जे कविसम्राट रवींद्रनाथ टागोर, ते या स्वभाषेच्या पुरस्काराबद्दल काय म्हणतात पहा. " पाश्चिमात्य शिक्षणपद्धति ही पौर्वात्यांनां अगदींच निरुपयोगी आहे, असें नाहीं, पण प्रचलित परिस्थिति पाहतां असें दिसतें कीं हिंदवासीयांच्या मनांतील

कोपरान् कोपरा परकीय शिक्षणानेंच व्यापून टाकला आहे. त्यामुळें होतें काय कीं नूतन तत्त्वांच्या मिळणीनें नूतन विचारशक्ति जागृत होण्याची महत्त्वाची संधि जी केव्हां तरी यावयाची, ती ही पद्धति अजिबात नष्ट करून टाकते.

13 "Foreign education occupies all the available space in the Indian mind, and so kills or hampers the great opportunity for the creation of a new thought-power by a new combination of truths."

ते पुढें म्हणतातः—

14 "English education as now given is for the Indian mind a kind of food which contains only one particular ingredient needful for its vitality, and even that not fresh, but dried and packed in tins. In our true food we must have co-ordination of all different ingredients—and most of these not as laboratory products, or in a desiccated condition, but as organic things similar to our own living tissues."

हा वरील उतारा वाचल्यावर वाचकांना वाटूं लागेल कीं यांत भाषेचा-स्वभाषेचा—मातृभाषेचा संबंध आहे कोठें ? रवींद्रबाबू प्रचलित पाश्चात्य

---

१३ हिंदवासीयांच्या मनाचा बहुतेक साराच भाग परकी शिक्षणानें व्यापून टाकला आहे. त्या कारणानें नवीन अशा तत्त्वांच्या जुळणीनें उत्पन्न होणाऱ्या विचारशक्तीच्या संभवाचा नायनाटच होत आहे.

१४ हिंदवासीयांच्या मनाला दिलें जाणारें सध्यांचें इंग्लिश शिक्षण हें अशा प्रकारचें अन्न आहे कीं त्याच्यांत जीवनशक्तीला जरूर असणाऱ्या द्रव्यांपैकीं फक्त एकाच विशिष्ट प्रकारचें द्रव्य आहे, व तें सुद्धां ताजें नसून सुकवून डब्यांत भरलेलें असें आहे. खरें अन्न म्हटलें म्हणजे त्यांत सर्व निरनिराळ्या द्रव्यांचा समावेश झाला पाहिजे व त्यांतील बहुतेक आमच्या हालत्या चालत्या अवयवांप्रमाणें सत्वसंपन्न असलीं पाहिजेत; यंत्रोत्पादित अथवा वाळवून भरलेलीं उपयोगाचीं नाहींत.

शिक्षणपद्धतीला फक्त नांवें ठेवीत आहेत. पण या सबंध लेखांत इंग्लिश शिक्षणपद्धति अथवा पाश्चात्य शिक्षणपद्धति असें जें त्यांनीं म्हटलें आहे त्याचा खरा अर्थ परकीभाषेंतून दिलें जाणारें शिक्षण असाच बऱ्हंशीं आहे. हा त्यांचा लेख मॉडर्नरिव्ह्यूच्या १९१९ च्या मे महिन्याच्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे. शिक्षणप्रणालींत मातृभाषेला त्यांनीं अत्यंत महत्त्व दिलेलें आहे. रवींद्रबाबू स्वतः उत्कृष्ट शिक्षक आहेत, हें साऱ्या जगास ठाऊक आहे. शिक्षक या नात्यानें त्यांचा स्वतःचा असा अनुभव आहे कीं, विद्यार्थ्यांना परकी भाषा शिकणें फार जड जातें. बाबूजींचा हा सिद्धांत मान्य केल्यावर त्यावरून त्यांनीं काढलेलें अनुमानही मान्य करणें प्राप्त आहे. त्यांचे ते अनुभव असे कीं, जे विद्यार्थी हुषार असून ज्ञानसंपादनार्थ तहानेलेले आहेत, परंतु ज्यांना परभाषेंत प्रावीण्य मिळविणें अशक्यप्राय होऊन जातें, त्यांना उच्च शिक्षणास मुकावयास लावून हताश करणें म्हणजे एकप्रकारें **राष्ट्राचा शक्तिपात** करणेंच होय. कोणी आक्षेपक आमच्या कोट्यवधि हिंदवासीयांतून चार दोन सुप्रसिद्ध वक्ते इंग्लंडांतील अथवा हिंदुस्थानांतील व्यासपीठावरून, खुद्द इंग्रजी ज्यांची जन्मभाषा आहे, अशांस देखील नवल वाटण्यासारख्या इंग्रजी भाषेंत अस्खलित वक्तृत्व करून परभाषाप्रभुत्व दाखविणाऱ्या व्यक्तींकडे बोट दाखवून, परभाषा हिंदवासीयांस अवगत होण्यास फारसें कठीण नाहीं असें जर म्हणतील तर त्याला रवींद्रबाबू उत्तर देतात, तें असें कीं, जरी परभाषा महाप्रयासानें विशिष्ट ग्रहणशक्तीच्या थोड्याशा विद्यार्थ्यांस उचलतां येईल असें मानून चाललें तरी बळकट दरवाजा खडखडावण्यांत व गाढ कुलुपाची नुसती किल्ली फिरवीत राहाण्यांतच अशा विद्यार्थ्यांचीं कित्येक वर्षें फुकट दवडणें हें तरी कसें समर्थनीय ठरतें ? स्वभाषेच्या द्वारें ज्ञानमंदिरांत त्यांचा एकदम प्रवेश झाल्यास त्या विद्यार्थ्यांचा अधिक फायदा होणार नाहीं काय ?

असें असतां एकेका विद्यार्थ्याचीं चार चार पांच पांच वर्षें मोफत घालविण्यांत राष्ट्रकार्याची किती हानि होत असते याविषयीं थोडासा दूरवर विचार केल्यास मन विषण्ण झाल्याशिवाय राहत नाहीं.

मातृभाषेचें महत्त्व पूर्वी सांगितलेलें आहे, व रवींद्रबाबूंचा आशय स्पष्ट नमूद केला आहे. या बाबतींत आणखी एका हिंदसेवकाचा अभिप्राय नमूद केल्यास अस्थानीं होणार नाहीं. ते हिंदसेवक म्हणजे प्रख्यात राष्ट्रधुरीण बाबू बिपिनचंद्र पाल हे होत. पाल बाबू म्हणतात,–

15 "One of the practical injunctions in regard to the conduct of education along national lines is that *the medium of instruction should be* not the foreign language, but *the vernacular of the people themselves.*"

राष्ट्रीय शिक्षणाची व्याख्या करतांना ते ह्मणतात कीं, राष्ट्रीय शिक्षणांत त्या राष्ट्राचें स्वत्व प्रतिबिंबित झालें पाहिजे. राष्ट्रीयत्व त्याच्यांत दिसलें पाहिजे.

16 "In National education, we shall have to follow our leading, our guidance, and *our own specific characteristic as a nation.*

यांतील इटॅलिक शब्द महत्त्वाचे आहेत. स्वभाषेशिवाय स्वत्व कसें टिकणार बरें ?

ह्मणूनच मातृभाषेचें महत्त्व शिक्षणांत फार आहे. आणि शिक्षणाच्या आरंभापासून अंतापर्यंत शिक्षणक्रमांत मराठीचा रिघाव झाल्यावांचून महाराष्ट्रीयाला स्वास्थ्य वाटतां कामा नये. हें अस्वास्थ्य नुसतें मनांत असून उपयोगीं नाहीं. तें घालवून स्वास्थ्यप्रद ध्येय गांठण्याचे प्रयत्न अव्याहत चालू राहिले पाहिजेत. युनिव्हर्सिटीच्या सर्व परीक्षांत तिचा अंतर्भाव करावयास लावणें ही प्रयत्नांची एक दिशा, तर मराठींत सर्व ज्ञान-शास्त्राचें भरपूर अभिजात वाङ्मय निर्माण करणें ही दुसरी दिशा होय. हें दोंहाती कार्य करीत राहिल्यास आपलें ध्येय आपल्या हातीं अगदीं जलद लागल्यावांचून राहणार नाहीं.

---

१५ शिक्षणाचें माध्यम परभाषा न करितां शिकणाऱ्या लोकांची मातृभाषाच करणें, हा राष्ट्रीयशिक्षण पद्धतीच्या निर्बंधांपैकीं एक आहे.

१६ राष्ट्रीय शिक्षणामध्यें आम्हीं आमचेंच नेतृत्व, आमचेंच धोरण, आणि आमचेच विशिष्ट गुणधर्म अनुसरले पाहिजेत.

# प्रकरण ५ वें.

## मराठीस संस्कृताचें साहाय्य.

मराठी भाषेंत नवीन ग्रंथरचनेला आतांच सुरुवात झाली आहे. नवीन ग्रंथरचनेला याचा अर्थ आधुनिक शास्त्रांसंबंधीं माहितीच्या ग्रंथरचनेला असें समजावयाचें. भाषेमध्यें ज्या विविध शास्त्रांबद्दल व कलांबद्दल ग्रंथ लिहावयाचे तत्तद्विषयक पारिभाषिक शब्द पाहिजेत. इथूनच ग्रंथरचनेच्या अडचणीला सुरुवात होते. या विषयावर या प्रकरणांत थोडेंसें लिहावयाचें आहे.

नवीन संसार थाटतांना ज्या ज्या उपकरणांची गरज कन्येला ज्या ज्या वेळीं लागते, त्या त्या वेळीं त्या त्या वस्तूकरितां ती आशेनें आपल्या मातेच्या मुखाकडे पहात असते. मराठीनें अशा वेळीं आपल्या आईकडे, संस्कृत माउलीकडे आशापूर्ण नजरेनें पाहिल्यास तिची निराशा होईल काय ?

कोणी म्हणतील निराशाच होईल. संस्कृत भाषा प्रचारांतून गेली आणि जरी प्रचारांत असली तरी आधुनिक शास्त्रांच्या ग्रंथरचनेच्या परिभाषेला पुरवठा करण्याइतकी ती समृद्धावस्थेंत कधींही नव्हती. पण याला चोख उत्तर आपणाला हल्लीं परस्परच दोघां महाराष्ट्रीय विद्वानांकडून मिळत आहे. एक श्रीयुत श्रीपाद दामोदर सातवळेकर व दुसरे शिल्पकलानिधि रा. सा. कृष्णाजी विनायक वझे एल. सी. ई. पेन्शनर इंजिनियर नाशिक हे होत. या दोघांनींही वेदकालीन व पुराण वाङ्मयाचें अवलोकन करून अश्रुतपूर्व माहिती लोकनिदर्शनास आणिली आहे व तत्कालीन आर्य सुधारणांची माहिती जनतेस करून दिली आहे. रा. सा. वझे यांनीं तर आपल्या लेखां-तून वास्तुशास्त्र व शिल्पशास्त्र, खनिशास्त्र व भूस्तरशास्त्र वगैरे आधुनिक म्हणून समजावयाच्या शास्त्रांना तत्कालीन पारिभाषिक शब्दांच्या जंत्या

देखील आपल्या कित्येक लेखांतून दिल्याचें स्मरतें. शिवाय सावरकर बंधूंचे भाषाविषयक प्रयत्नही स्तुत्य आहेत.

मराठीला शिक्षणक्रमांत जें महत्त्व मिळावयाचें, तें मिळावयाच्या पूर्वींच श्री. वासुदेव गोविंद आपटे यांच्या आनंदकार्यालयामार्फत मुलांकरितां सोप्या भाषेंत कित्येक शास्त्रीय पुस्तकें प्रसिद्ध होऊं लागलीं आहेत, आणि बडोदें येथील सहाविचारिणी सभेमार्फत श्री. दाजी नागेश आपटे, वाकसकर, जोशी वगैरे विद्वानांचे मराठी भाषेच्या अभिवृद्ध्यर्थ जे स्तुत्य प्रयत्न चालले आहेत, त्यांचें दृश्यफल म्हणजे विद्युच्छब्दकोश वगैरे ग्रंथ हें होय. मराठीला कोणत्याच प्रकारचें उत्तेजन मिळावयाच्या पूर्वींच जर स्वयंप्रेरणेनें वरच्यासारख्या उत्साही विद्वान् गृहस्थांनीं असे प्रयत्न चालविले आहेत तर मराठीला तिचा योग्य दर्जा मिळाल्यानंतर तिच्यांत उच्च शिक्षणक्रमास आवश्यक अशी ग्रंथनिष्पत्ति होणार नाहीं असें अनुदारपणाचें अनुमान काढणें अप्रगल्भ-पणाचें द्योतक होणार नाहीं काय ? मराठीचा प्रवेशपरीक्षेंत शिरकाव झाला तर शिक्षणक्रमास जरूर असलेलीं पुस्तकें तयार झालींच कीं नाहींत ? मग तीं पुढच्याच परीक्षांस तयार होणार नाहींत असें कां म्हणून मानावें ? कदाचित् पुस्तकें तयार झालीं असें मानलें, तरी तीं इतर भाषांच्या पुस्तकां-प्रमाणें उच्च दर्जाचीं निपजणार नाहींत असा आक्षेप घेण्यांत आला, तरी तो व्यर्थ होय. कारण मराठीला जिचा पाठिंबा आहे, ती संस्कृत भषा लेचीपेची नव्हती हेंच आतां दाखवून द्यावयाचें आहे.

प्राचीन काळीं जेव्हां गुरुशिष्यपरंपरेनें विद्याध्ययन होत असे, तेव्हां विद्यार्थ्यांला ब्रह्मचर्याश्रमाच्या अवधींत पुढील विषयाचें ज्ञान आवश्यक होतें. ते वेद आणि वेदांगें या दोन सदरांत मोडतात. वेद चार सुप्रसिद्धच आहेत. वेदांगांत पुढील विषय आहेत.

१ शिक्षा (Phonetics) २ छंद (Metre) ३ व्याकरण (Grammar) ४ निरुक्त (Etymology or Explanation of words) ५ ज्योतिष (Astronomy) व ६ कल्प (Ceremonial and religious

practice). हीं सहा वेदांगें अथवा षट्शास्त्रें होत. या एकेका अंगांतून पुन्हां अनेक उपांगें उद्भवलीं तीं निराळींच. उदाहरणार्थ कायदा व नीतिशास्त्र हें " कल्प " मधून निघालें.

छांदोग्योपनिषदांत अशी कथा आहे कीं एकदां नारद सनत्कुमारांकडे गेले आणि म्हणाले,— " महाराज ! मला विद्या शिकवा. "

त्यावर सनत्कुमारांनीं उलट प्रश्न केला " तुला अगोदर काय येतें, कितपत अध्ययन झालें आहे तें मला सांग, म्हणजे मग मी तुला काय शिकवावयाचें तें पाहीन. "

त्याला नारदांनीं उत्तर देतांना पुढील विद्या आपल्याला येतात असें सांगितलें आहे.

ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वण, इतिहासपुराणें ( भारतादि ), वेदांचा वेद ( व्याकरण ), पित्र्य ( पितृयज्ञाचे विधि ), राशि (गणित), दैव ( ज्योतिष ), निधि ( कालगणनाशास्त्र ), वाकोवाक्य ( तर्कशास्त्र ), एकायन ( तत्त्वज्ञान ), देवविद्या ( व्युत्पत्तिशास्त्र ), ब्रह्मविद्या ( यांत शिक्षा, कल्प आणि छंदःशास्त्र या तीन शाखांचा अंतर्भाव होतो ), भूतविद्या ( यक्षराक्षसभूतादिकांसंबंधीं ), क्षात्रविद्या ( शस्त्रास्त्रविद्या ), नक्षत्रविद्या ( खगोलशास्त्र ) सर्पदेवजनविद्या ( यांत सर्पज्ञान, विषसंबंधीं माहिती व त्यावर उपाय आणि अत्तरें व अर्क काढणें, नृत्यकला, गायनकला, क्रीडा, व इतर ललितकला वगैरे पुष्कळ विद्या येतात.)

इतक्या विद्यांत पारंगत झालेला शिष्य आणखी विद्या शिकण्याची इच्छा दर्शवितो व त्याला शिकविण्याच्या योग्यतेचे गुरुही त्या काळीं होते यावरून काय अनुमान निघतें बरें ?

वेद, वेदांच्या नंतर उपनिषदें व ब्राह्मणें, आरण्यकें व तदनंतर इतर विद्या असा हा ज्ञानविस्तार झालेला आहे. या उपनिषद्-ग्रंथांची स्तुति मॅक्समुल्लर, शोपेनहॉर सारख्या पाश्चिमात्य पंडितांनीं मुक्त कंठानें केलेली आहे. असलें ज्ञानभांडार पृथ्वीवरील दुसऱ्या कोणत्याही देशांत नाहीं असें

पाश्चिमात्य लोकांनीं मानिलें आहे. तत्कालीन आर्य लोक सर्व कलाकौशल्यांत प्रवीण असून यंत्रतंत्र विद्येंतही पारंगत होते. त्यांनीं भौतिक विद्येंत पारंगतता मिळवून आध्यात्मिक विद्येंतही प्रावीण्य व जगाचें नेतृत्व संपादिलें होतें.

ऐतरेय, शतपथ, साम आणि गोपथ हे चार प्रसिद्ध ब्राह्मण ग्रंथ होत. आपल्याला सध्यांच्या शिक्षणक्रमांत ज्या परिभाषेचा एवढा बागुलबोवा वाटत आहे, ती परिभाषा या ग्रंथांत दर्शित करून ठेविलेली आहे असें कणाद मुनींनीं म्हटलें आहे. या ब्राह्मण ग्रंथांत वेदांचें सार दिलें असून शिवाय अनेक प्रकारची माहितीही आहे.

ब्राह्मण ग्रंथांतील विषयांचे पांच मुख्य भाग पाडतां येतील.

१ गाथाः—यांत महर्षि याज्ञवल्क्य आणि मैत्रेयी यांच्यामधील संवाद रूपानें जीवानें सद्गतिप्रीत्यर्थ ब्रह्मविद्येचें अध्ययन कसें करावें हें सांगितलें आहे.

२ इतिहासः— यांत देवदानवांतील युद्धकथांचीं वर्णनें आहेत.

३ पुराणः— सृष्टीच्या उत्पत्तीचें व प्रलयाचें वर्णन यांत सांपडतें.

४ कल्पः— वैदिक मंत्रांचे अर्थ, यज्ञद्रव्याच्या गुणधर्मांची माहिती, आणि याज्ञिक कर्मकांडाची हकीकत यांत आढळते.

५ नाराशंसी विद्याः— मानव जातीच्या जीविताबद्दलची विशेष माहिती यांत आहे.

हे ब्राह्मण ग्रंथ व त्यांचें महत्त्व किती आहे, हें यावरून दिसून येईल. शिवाय ज्या संस्कृत भाषेंत व्याकरण शास्त्रावर महर्षि पाणिनीची अष्टाध्यायी आहे, व तीवर महर्षि पातंजलीचें महाभाष्य आहे, शब्दार्थाच्या माहितीवर यास्कजींचा निघंटु ऊर्फ निरुक्त ग्रंथ आहे, गायन विद्येवर पिंगलाचार्यांचें पिंगलसूत्र आहे, व नारदांची संहिता आहे; मानव धर्मावर मनुस्मृतीसारखे ग्रंथ आहेत, इतिहासावर व्यास वाल्मीकिसारख्यांचे महाभारत—रामायणासारखे ग्रंथ आहेत, आयुर्वेदावर सुश्रुत– चरकासारखे ग्रंथ आहेत, ज्योतिः–

शास्त्रांवर— कला शास्त्रांवर इतर अनेक ग्रंथसंपत्ति आहे; ती संस्कृत भाषा परिभाषेकरितां आपल्या कन्येस—मराठीस—दुसऱ्यांच्या तोंडाकडे पहावयास खास लावणार नाहीं.

आयुर्वेदांत चरक आणि सुश्रुत हे दोन मुख्य ग्रंथ आहेत. सुश्रुत ग्रंथ धन्वंतरीचा व चरक हा चरकाचार्यांचा. त्याचें संपादन पतंजलींनीं केलें. सुश्रुतांचीं भाषांतरें अरबस्थान, इटाली व जर्मन वगैरे देशांत झालीं असून, चरकाचें भाषांतर देखील अरबी भाषेंत झालेलें आहे. या दोन ग्रंथांत मिळून पुढील विद्यांची माहिती आहे.

१ रसायन विद्या-( Chemistry )
२ वनस्पती विद्या-( Botony )
३ जंगम विद्या-( Zoology )
४ खंजविद्या अथवा खनिविद्या ( Minerology )
५ शरीरतंत्र विद्या ( Physiology )
६ शाल्यविद्या ( Surgery )
७ कामचिकित्सा ( Medicine )
८ पदार्थविज्ञान ( Physical Science )
९ अगाद अथवा विषनिवारणविद्या ( Antidotes )

शाल्यविद्येमध्यें छेदन, भेदन, लेपन, शिवण याविषयींची माहिती आहे.

ज्योतिषविषयक ग्रंथांत पुढील विषय आहेत.

१ बीजगणित ( Algebra )
२ रेखागणित ( Euclid )
३ भूगोल ( Geography )
४ खगोल (Astronomy )
५ भूगर्भशास्त्र ( Geology )

या जुन्या ग्रंथांत विश्वकर्म्याची विमानविद्या व कलाशास्त्र, नलाचें पाकशास्त्र, मयाची शिल्पविद्या, वराहमिहिर व शुक्रनीतिकार यांची वास्तु-

विद्या याबद्दल देखील माहिती सांपडते. त्यावेळच्या शिल्पकारांनीं " अश्वत्री " नामक जहाज बांधलेलें प्रसिद्ध आहे.

तात्पर्य, पुराणकालच्या अभ्यासक्रमांत वेद, व्याकरण, शिक्षा, कल्प, निघंटु, छंद, ज्योतिष, इतिहास, गाथा, नाराशंसीविद्या, पितृविद्या, खनि विद्या, गणित, प्राकृतिक विज्ञान, आत्मिक विज्ञान, तर्कशास्त्र, नीतिशास्त्र, उत्पातविद्या ( भूगर्भांतील आग, ज्वालामुखीचे स्फोट, वीज वादळसंबंधीं ज्ञान ) ब्रह्मविद्या, शारीरविद्या, भूतविद्या, धनुर्वेद, शासन शास्त्र, सर्पदेव जनविद्या इत्यादि विषयांचा अभ्यास चालत असे.

अर्थात् या ग्रंथांचें शोधन केल्यास त्यांतून आपल्या मराठी ग्रंथरचनेस परिभाषेची ददात पडणार नाहीं, अशी आशा वाटते. अनिर्वाहपक्षीं मूळ इंग्रजी शब्द जशाचे तसे ठेवले तरी काय हरकत आहे ? पण असल्या कारणांनीं यापुढें मराठीच्या ग्रंथरचनेस आळा पडावयास नको. शिवाय बडोद्याच्या सहविचारिणी सभेनें जो धडा घालून दिला आहे, तो ठिकठिकाणच्या वाङ्मय मंडळांनीं गिरविल्यास देखील बराच कार्यभाग होईल.

या शिवाय प्रांतवार साहित्यसेवा मंडळें स्थापून त्या त्या प्रांतांत प्रचलित असलेल्या विशिष्ट शब्दांचें टांचण करणें आवश्यक आहे. जुन्या मराठी वाङ्मयांत देखील बरीच शब्दसंपत्ति आहे. तिचाही जरूर तेव्हां जीर्णोद्धार करीत गेलें पाहिजे. हें कार्य हौशी साहित्यसेवकांचें आहे.

तात्पर्य एवढेंच कीं, मराठीस तिचा योग्य दर्जा प्राप्त झाल्यास तिच्यांत लागेल तेवढें वाङ्मय निपजूं लागेल याविषयीं बिलकूल शंका नको.

मराठी भाषा निवळ बोध-भाषा किंवा प्रांतभाषा म्हणून ओळखली जाण्यांत मराठी भाषाभिमान्यांच्या श्रमाची इतिकर्तव्यता होत नाहीं. तिला इंग्लिश, लॅटिन, संस्कृत इत्यादि अभिजात भाषांच्या वर्गांत बसविण्याचें ध्येय त्यांनीं आपल्या डोळ्यांसमोर ठेवलें पाहिजे. मग तें दीर्घकालावधीनें व अनेक पिढ्यांच्या श्रमानें का होईना, पण त्या दृष्टीनें सर्वांनीं कार्य करावयास एकजुटीनें झटलें पाहिजे.

---

# प्रकरण ६ वें.

## मराठीची बोधभाषा होण्याची पात्रता.

मराठी भाषेच्या अभिवृद्धीला संस्कृत भाषेंतील जुनें वाङ्मय पोषक होईल; तसेंच महाराष्ट्री भाषेंतील वाङ्मयदेखील सहाय्यक झाल्याशिवाय राहणार नाहीं. श्री. वि. ल. भावे यांनीं आपल्या " महाराष्ट्र—सारस्वत " ग्रंथांत मराठी भाषेची पूर्वपीठिका दिलेली आहे. ती देतांना मराठी संस्कृतांतून निर्माण झाला कीं स्वतंत्रच निर्माण झालेली आहे अशी शंका त्यांनीं उत्पन्न केली आहे; पण त्या शंकेचें निरसन मात्र त्यांनीं केलेलें नाहीं. त्यामुळें मनास मळमळ लागून राहाते. कसें झालें तरी, त्यांनीं दिलेल्या वंशवृक्षावरून मराठीचें संस्कृत भाषेशीं मावशीचें नातें लागतें. आम्ही तिला आतांपर्यंत मातां म्हणून लेखिलें आहे. वैदिक भाषेमधूनच दोघींचाही उगम आहे. वैदिक भाषा हें नांव निराळें असलें तरी ती संस्कृतच होय. म्हणून संस्कृतापासूनच मराठीचा उगम मानला पाहिजे.

मूळ संस्कृत भाषेमधून रूपांतर पावत मराठीला आजचें स्वरूप प्राप्त झालें आहे. तेव्हां महाराष्ट्री, अथवा अपभ्रंश महाराष्ट्री हीं मराठीचीं प्राचीन स्वरूपें झालीं. आणि ह्या स्वरूपांत असतांना देखील मराठीमध्यें त्या वेळीं भरपूर ग्रंथरचना झाली आहे आणि ती ग्रंथरचना देखील इतकी झाली आहे कीं तिच्या स्वरूपाला स्वतंत्र भाषा मानण्याइतकें महत्त्व श्री. भावे यांच्यासारख्या गाढ्या पंडितांस देणें अगत्याचें वाटलें. एखादी नदी उगमापासून निघून निरानिराळ्या देशांतून वाहात जाऊं लागली कीं निरनिराळ्या ठिकाणीं निरानिराळीं नांवें तिला प्राप्त होतात. परंतु त्या नदीच्या प्रवाहाचें एकत्व कांहीं भंग पावत नाहीं. तद्वत् मराठीच्या भिन्नकालीन स्वरूपाला भिन्न नांवें असलीं तरी तिच्या पुराणत्वाला व संपन्नतेला बाध येत नाहीं.

दुसरी गोष्ट अशी कीं तत्त्वसिद्धीच्या सोईसाठीं " महाराष्ट्री–अपभ्रंश " असें स्वतंत्र नांव भावे यांना कल्पावें लागलें तरी महाराष्ट्री अपभ्रंशांमध्यें ग्रंथ उपलब्ध नाहींत. कदाचित् असे ग्रंथ असले, तरी ते उपलब्ध होईपर्यंत " अपभ्रंश–मराठी " चा मधला दुवा विसरून जाण्यास मुळींच हरकत नाहीं.

मराठीच्या स्वतंत्र अस्तित्वाला अकराव्या शतकांत प्रारंभ झाला असें मानलें तरी आज विसाव्या शतकापर्यंत उणीपुरीं ९०० वर्षें जी भाषा आपला टिकाव धरून प्रतिकूल परिस्थितीमध्यें देखील पुढें पुढें पाऊल टाकीत चालली आहे तिचें सामर्थ्य कमी समजावयाचें काय ?

इंग्रजी भाषेला तिच्या आरंभींच जी अनुकूल स्थिति प्राप्त झाली तशी जर मराठीला प्राप्त होती, तर ती आजच्याच खुज्या स्वरूपांत रांगतांना दिसली असती काय ? मराठीसारखी चारी बाजूंनीं गळचेपी दुसऱ्या कुठल्या भाषेच्या कपाळीं आली आहे काय ?

इतक्या प्रतिकूल परिस्थितींत, इतक्या आंचणींत, इतक्या जाचणींत, इतक्या बोंचणींत, इतक्या टोंचणींत जी भाषा आपलें सामान थोडक्याशा जागेंत सांभाळून आपला गरिबीचा साधासुधा संसार आज इतकीं शतकें कशीबशी आपल्या मुलांलेकरांकरितां सांवरून धरीत आहे, तिच्या नशिबीं भावी भाग्योदय खास आहे, ही खात्री प्रत्येक साहित्यभक्तानें, प्रत्येक मराठीच्या पुरस्कर्त्यानें, प्रत्येक मराठीच्या अभ्यासकानें, प्रत्येक मराठीच्या विद्यार्थ्यानें, त्याचप्रमाणें मराठीच्या प्रत्येक प्रतिस्पर्ध्यानें देखील मनाशीं असूं द्यावी.

मराठींतील स्वतंत्र ग्रंथरचनेचा इतिहास येथें लिहावयाचा नाहीं. तें काम आतांपर्यंत जोशी, भावे, पोतदार, नाडकर्णी वगैरे बऱ्याच जणांनीं केलेलें आहे. बोधभाषा म्हणून मराठीचा हक्क बजाविण्याचा काळ आतां आला आहे किंवा नाहीं याचीच छाननी झाली पाहिजे आहे.

भाषेच्या या हक्काच्या शाबितीला तिची संपन्नता व सुव्यवस्थितता दिसून आली पाहिजेत. पण एका अर्थीं सुसंपन्नता ही मुळीं पूर्वीं कीं पश्चात्

हाच प्रश्न उत्पन्न होतो. पण या हक्काच्या मान्यतेला व सुरुवातीला जरूर तेवढी संपन्नता या मराठींत आहे हें दुराग्रह सोडून पाहिल्यास कोणालाही कळून चुकेल. ज्ञानकोश हें भाषेच्या संपन्नतेचें एक निश्चित लक्षण म्हणून मानलें जातें. मराठी भाषेला हें भाग्य डॉ. श्री. व्यं. केतकर व त्यांच्या विद्वान् सह-संपादक मंडळानें प्राप्त करून दिलें आहे. डॉ. साहेबांना या त्यांच्या श्रमांचा मोबदला आर्थिक स्वरूपांत भरपूर मिळाला नाहीं, तरी मराठी भाषा जगांत जिवंत असेपर्यंत त्यांनीं तिच्यावर चढविलेला हा अमोलिक अलंकार ती जगापुढें बहुमानानें व डौलानें मिरवीत राहील. तिच्या संसारांत तिला हें एक श्रीमंतीचें लेणें लाभलें आहे यांत मुळींच शंका नाहीं. हें लेणें अभिनव मराठी भाषेला जसें शोभादायक आहे, तसेंच तिच्या अस्तित्वापर्यंत तें डॉक्टरसाहेबानां अजरामरत्व देणारें आहे. हेंही कांहीं कमी नाहीं.

कोणत्याही अभिजात भाषेला सुसंबद्ध व्याकरण हें तिच्या सुव्यवस्थितपणाचें प्रमुख लक्षण आहे. मराठी भाषेच्या व्याकरणाचा इतिहास फार दूरचा नाहीं, तरी एका शतकाचा आहे. त्याच्या पूर्वींची माहिती नीटशी उपलब्ध नाहीं. पण त्यापूर्वीं व्याकरण नसेलच असें मानतां येत नाहीं. कारण बाराव्या शतकापासूनच जर सुसंबद्ध व सुसंघटित ग्रंथरचना सुरू आहे तर तिला व्याकरणशास्त्राचे नियम कांहीं तरी प्रमाणभूत म्हणून मानले गेलेच असले पाहिजेत.

मराठींतील महानुभावपंथीय वाङ्मय सोडून देऊन अगदीं आधुनिक भाषेशीं मिळतें वाटणारें वाङ्मय पाहिलें तरी मुकुंदराज–ज्ञानदेवापासूनचा वाङ्मयनिर्मितीचा ओघ अखंड व अस्खलित चालू आहे. मुकुंदराज–ज्ञानदेव या दोघांतही आधींची ग्रंथरचना कोणाची हा पुन्हा एक वादग्रस्त प्रश्न आहे. तथापि बाराव्या शतकापासूनचा कालावधि प्रमाण धरून चालण्यास हरकत नाहीं. तेव्हां या गेल्या सात आठ शतकांत ग्रंथरचनेस प्रमाणभूत असें व्याकरण नसावें, असें संभवत नाहीं. तें तोंडींच बसलेलें राहिलें असेल, अथवा ग्रंथनिविष्ट होऊन अनुपलब्ध झालें असेल.

कसेंही झालें, तरी एका शतकाचा उपलब्ध इतिहास देखील मराठी भाषेच्या प्रगल्भतेस अपुरा मानण्याचें कारण नाहीं. दादोबांकडे व्याकरण ग्रंथ पहिल्याप्रथम लिहिल्याचा अग्रमान जातो. तेच पहिले व्याकरण—प्रवर्तक होत.

दादोबांच्या नंतर व्याकरणलेखक म्हणजे प्रि. आगरकर हे होत. पण त्यांच्या पूर्वीं दरम्यान कृष्णशास्त्री चिपळूणकर व कृष्णशास्त्री गोडबोले यांची लेखनपद्धति व्याकरणशास्त्र दृष्टया फार मार्गदर्शक झाल्या-वरून त्यांनाही अप्रत्यक्षपणें व्याकरणाचे नियम विषद् केल्याचा मान मिळत असतो.

आगरकरांच्या शिवाय रा. रा. भि. जोशी, श्री. खेर, रावजीशास्त्री गोडबोले, बाळशास्त्री जांभेकर, गंगाधर शास्त्री–टिळक, गो. जि. केळकर, वागळे, वि. का. राजवाडे व मो. के. दामले इत्यादिकांनीं व्याकणरचना करून मराठी भाषेस नीटनीटकें स्वरूप देण्याचें श्रेय घेतलें आहे.

पण प्रो. द. वा. पोतदार म्हणतात कीं, दादोबांच्याही पूर्वीं कर्नल जॉर्ज जरविस यांनीं मराठी शास्त्री पंडितांच्या साह्यानें एक व्याकरण तयार करविलें होतें व तें इ. स. १८२४ पासून १८३६ पर्यंत चाललें. पुढें दादोबांचें व्याकरण १८३६ सालींच प्रसिद्ध झाल्यामुळें तुटपुंज्या जर्विसी व्याकरणाचा अस्त झाला असावा. एवंच मराठी भाषेच्या व्याकरणबद्धतेची परंपरा भर-पूर एका शतकाची आहे.

बोधभाषेची योग्यता यावयास त्या भाषेंत शब्दकोशही पाहिजेत. आणि तसे कोश आपल्या मराठी भाषेंत पूर्वींपासूनचे आहेतही. व्याकरणाप्रमाणें, कोशाचा आरंभ करून देण्याचें कामही युरोपियन लोकांनींच केलें आहे, असें खेदानें म्हणावें लागतें. त्यांना मदतगार मात्र आपले शास्त्रीपंडित. पण पुढाकार घेणारे युरोपियन मिनशरी लोक. जो खेळ बंगालयांत झाला, तोच महाराष्ट्रांत. पूर्वीं या गोष्टीचा ओघानें उल्लेख केलाच आहे. एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या चरणांत इ. स. १८२० च्या नंतर प्रथम केनेडीचा

व तदनंतर मोलस्वर्थचा मराठी कोश प्रचारांत आला. त्यानंतर लहान मोठे कोश निर्माण झाले. त्यांत शेवटचा मराठी–मराठी असा कोश वा. गो. आपटे यांचा हल्लींच प्रसिद्ध झाला.

तेव्हां व्याकरण, कोश व ज्ञानकोश या तीन मुख्य गोष्टी मराठी भाषेची प्रगल्भता सिद्ध करीत असतानां तिला बोधभाषा होण्याची मान्यता मिळण्यास कोणाचीही आडकाठी येऊं नये, व तिला तिचा संसार थाटण्यास भरपूर वाव मिळावा असें साहाजिकपणेंच वाटतें.

---

# प्रकरण ७ वें.

## इंग्रजी व बंगाली.

पूर्वींच्या प्रकरणांत प्रसंगवशात् आम्हीं इंग्रजी भाषेचा उल्लेख केलेला आहे. इंग्रजी भाषेला आज जें एवढें जगड्व्याळ स्वरूप व जी वैभवसंपन्नता प्राप्त झाली आहे, त्यानें आपले डोळे दिपून जातात. पण त्या भाषेची देखील आरंभीं स्थिति कशी होती ? पंधराव्या सोळाव्या शतकाच्या सुमारास इंग्रजींत भाषण, लेखव्यवहार करणें तत्कालीन सुशिक्षितांस हीनपणाचें व लाजिरवाणें वाटत असे. म्हणजे इंग्रजीची भरभराट ही अवघ्या चार पांच शतकांतलीच आहे. नामदेव–एकनाथांच्या कालीं संस्कृतप्रविण शास्त्री–पंडितांस मराठी भाषा जितकी तुच्छ वाटत असे, तितकीच इंग्लंडांत लॅटिन्–ग्रीक पंडितांस इंग्रजी भाषा तिरस्करणीय वाटत असे. महाराष्ट्रांत तर शास्त्रीपंडित काल काल एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापर्यंत मराठीस धिकारीत असत. तीच स्थिति इंग्लंडांत होती. मि. एच्. डब्ल्यू. हाउस–होल्डसाहेब म्हणतात–

17 “If a man would commune with great minds, whether of the past in their writings or of the present by

cultured speech, he must have Latin. Would he be a Churchman, an administrator, a diplomatist? He must speak fluently, he must read and write with ease, the international tongue. Would he be a man of Science, of medicine, of law, of letters? Again he must have Latin, *for there were not the books in English.* Without Latin he could neither learn, nor teach."

त्यावेळीं लॅटिनशिवाय कोणताही व्यवहार होत नव्हता. इंग्रजीला कोणी चुकूनही विचारीत नसे. याला कारण म्हणजे इंग्रजी भाषेंत त्यावेळीं मुळीं पुस्तकेंच नव्हतीं. ही ज्या भाषेची स्थिति, ती भाषा आज इतक्या थोडया अवधींत अठराकोटी लोकांची सन्माननीय अशी मातृभाषा बनली असून कोणत्याही युरोपीय भाषेपेक्षां इतर देशांतून अधिक प्रसार पावून राहिली आहे ! पुस्तकें एका काळीं तयार नव्हतीं म्हणून तिचा प्रसार थांबून राहिलेला नाहीं.

प्राच्य विद्या आणि संस्कृत भाषा यांचा मेकॉलेसाहेबांनीं धिक्कार केला ! पण ज्या बंगाल्यांत हा प्रकार झाला, त्याच बंगल्यांत प्राच्यविद्यासंशोधनाचें कार्य अप्रतिम आस्थेनें आतां होऊं लागलें आहे. या कार्याकरितां १९१७ सालीं सुमारें पन्नास विद्वान् लोकांची नेमणूक होऊन संशोधन सुरू झालें. मॅट्रिकच्या परीक्षेला १८६१ सालीं व बी. ए. च्या परीक्षेला १८६४ सालीं देशी भाषांतून उत्तरें देण्याची सवलत ज्या युनिव्हर्सिटीनें काढून घेतली होती त्याच कलकत्ता युनिव्हर्सिटीचे व्हाइस्चॅन्सेलर सर अशुतोष मुकर्जी १९२२ सालीं म्हणतात–

---

१७ ग्रंथद्वारा भूतकालीन, अथवा व्युत्पन्न भाषेच्या द्वारा सद्यःकालीन थोर पुरुषांशीं विचार-व्यवहार कर्तव्य झाल्यास लॅटिन भाषेची जरूरी लागे. राजकारणी, अथवा मुत्सद्दी व्हावयाचें म्हटल्यासही तीच लॅटिन भाषा त्याला लिहतां वाचतां येणें अवश्यक होतें. शास्त्रवेत्ता, डॉक्टर, कायदेपंडित अथवा विद्वान व्हावयास देखील लॅटिनच लागे. कारण इंग्रजींत मुळीं पुस्तकेंच झालीं नव्हतीं. तेव्हां लॅटिन भाषेशिवाय अध्यापन व अध्ययन दोन्हहि अशक्यच होतीं.

18 "... ... ... that great department of Indian Vernaculars which is a special feature of our University and which should constitute its chief glory in the eyes of all patriotic and public spirited citizens..."

एकंदरींत कलकत्ता युनिव्हर्सिटींत अशा प्रकारें अकस्मात् इष्ट दिशेनें फरक होऊन खऱ्या सुधारणेस प्रारंभ होतांच लोकांस समाधान वाटलें. प्रथम भलत्या गोष्टीस हात घालून कटु अनुभव घेतल्यावर बंगाली विद्वानांत जागृति झाली. त्या अनेक वर्षांच्या कटु अनुभवाचा सारांश सर अशुतोष मुकर्जीच्या पुढील सुवर्णतुल्य प्रत्ययोद्गारांत आहे. ते म्हणतात—

✓ 19 "Western civilisation, however valuable as a factor in the progress of mankind, should not supersede much less be permitted to destroy, the vital elements of our civilisation."

बंगाली लोकांना हा अनुभव फार महाग पडला. आपणा महाराष्ट्रीयांना हा फारसा स्वस्त आहे असें नाहीं, पण जेवढी बचत होईल तेवढी करण्याकडे जर धोरण असेल तर हा अनुभव महाराष्ट्रीयांनीं देखील आपला मार्गदर्शक समजण्यास हरकत नाहीं.

आत्मसंस्कृति पुनरुज्जीवित करण्याच्या इराद्यानें ज्या शिक्षणसंस्था हिंदुस्थानांत अस्तित्वांत आल्या त्यांत दौलतपुरची हिंदु ॲकॅडेमी, हरिद्वारचें गुरुकुल व लाहोरचें दयाराम ॲंग्लो- वैदिक कॉलेज यांनीं प्रथम पुढाकार घेतला ! त्यानंतर बनारसची हिंदु युनिव्हर्सिटी अस्तित्वांत आली.

---

१८ प्रांतिक भाषा हें आमच्या विश्वविद्यालयाचें एक विशिष्ट रूप आहे व तें राष्ट्राभिमानी आणि बहुजन-हितसाधक लोकांच्या दृष्टीनें वैभवचिन्ह ठरलें गेलें पाहिजे.

१९ मानव जातीच्या सुधारणेंत भाग घेऊन पाश्चिमात्य संस्कृतीला कितीहि महत्त्व आलें असलें तरी तिला आम्ही आमच्या संस्कृतिला मारक तर होऊं देतां नयेच, पण आमच्या संस्कृतीच्या तत्त्वांच्या आड सुद्धां येऊं देतां कामा नये.

या सर्वांनीं संस्कृतचा व प्राच्य विद्यांचा अभ्यास शिक्षणक्रमात ठेवला असून देशी भाषांचा अभ्यासही त्यांनीं नजरेआड केलेला नाहीं. महाराष्ट्रांत या तत्त्वावर लहानसहान प्रयत्न झालेच नाहींत असें नाहीं, पण ते फार अल्प आहेत.

बंगाली भाषा आमच्या सर्व देशी भाषांत पुढारलेली आहे, हें सर्वमान्य आहे. इंग्रजी भाषेची हकीकत वर दिलीच आहे. बंगाली भाषेची देखील थेट तशीच आहे. एकुणिसाव्या शतकाच्या आरंभीं बंगालींत गद्य ग्रंथरचना मुळींच नव्हती. खुद्द बंगाली गृहस्थच बंगाली भाषेच्या उपयोगाच्या तत्त्वाला विरुद्ध होते. बंगाली भाषेंत बोलावयास त्यांना लाज वाटत असे. त्यावेळीं संस्कृत, आरबी, फारशी व नंतर इंग्रजी या भाषा उच्च दर्जाच्या मानल्या गेल्या होत्या.

नंतर श्रीरामपूरच्या मिशनऱ्यांनीं देशी भाषेंत—बंगालींत—प्रावीण्य संपादिलें. हेतु हा कीं बायबलचें भाषांतर बंगालींत करून हिंदी लोकांचा उद्धार करावा. या मिशनरी मंडळींत कॅरे ( Carey ) हा मुख्य होता व देशी भाषेचें खातें त्याच्याकडे होतें. त्यानें आपल्या साह्याला पंडितशास्त्री घेतलेच होते. ह्या अवधींत तींत इंग्रजी शब्द घुसले. भाषा मूळची बंगाली, परंतु वाक्यरचना इंग्रजीच्या धर्तीची. अशा प्रकारें तिची कुतरओढ सुरू झाली. पण हे हाल होतां होतां तिला शेवटीं नवीन टवटवी येऊं लागली. त्यांत व्याकरणरचना झाली. त्यांत बृहत्कोश तयार झाला व शब्दकोशही रचला गेला. या सर्वांचें श्रेय तिघांस द्यावें लागतें. डॉ. राजेन्द्रलाल मित्र व मि. के. एम. बानर्जी यांनीं " विद्याकल्पद्रुम " नामक बृहत्कोश बनविला; आणि रामकमल सेन यांनीं १५०० पृष्ठांचा इंग्रजी—बंगाली शब्दकोश तयार केला. यांत ५३०० इंग्लिश शब्दांचें भाषांतर केलेलें होतें. असें होतां होतां १८४५ सालीं डेविड हेअरच्या तिसऱ्या स्मृतिदिनाच्या वेळीं अक्षयकुमार दत्त व किशोरीचंद्र मित्र यांनीं बंगाली भाषेंत प्रथम व्याख्यानें दिलीं ! त्या वेळीं त्यांनीं आपल्या भाषणांत पुढील महत्त्वाचे शब्द उच्चारले होते.

20 "*The necessity and importance of cultivating the Bengali language the language of our country, the language of our infancy, the language in which our earliest ideas and associations are intwined—will ere long be recognised by all.*"

अशा प्रकारें हें गाडें भटकतां भटकतां शेवटीं मुळावर आलें. मराठीचेंही तसेंच झालें आहे. आज उन्नतीस चढलेल्या आशियाटिक व युरोपियन राष्ट्रांतील भाषांची प्रगति व समृद्धिदेखील अशीच झाली आहे. तेव्हां मराठीलादेखील आतां योग्य स्वतंत्रता देण्यांत कोणालाही भिऊन जाण्याचें कारण नाहीं.

---

# प्रकरण ८ वें.

## मातृभूमि आणि मातृभाषा.

मराठी भाषेचा अभिमान धरणें हें महाराष्ट्रीयांचें आद्य कर्तव्य आहे. पण राष्ट्रीय भाषेचा प्रश्न निघाला कीं मात्र महाराष्ट्रीयानां देखील व्यापकतेनें विचार करावा लागणें साहजिक आहे. हिंदुस्थानची राष्ट्रभाषा कोणती असावी हा मोठा प्रश्न आहे. राष्ट्राला राष्ट्रभाषा म्हणून कांहींतरी असलीच पाहिजे याबद्दल दुमत होणार नाहीं. ज्या राष्ट्रांत अनेक भाषा प्रचारांत नसतात त्यांच्या समोर असा प्रश्नच कधीं उभा राहाणार नाहीं. पण हिंदुस्थानचें तसें नाहीं. हिंदुस्थानांत १३ मुख्य भाषा असून त्या बोलणारांचें प्रत्येकीं सरासरी प्रमाण ५०००००० आहे. हिंदुस्थान हें स्वतंत्र खंडच आहे,

२० जी आमच्या देशाची भाषा, आमच्या बाळपणची भाषा, जिच्यामध्यें आमचे अगदीं पहिल्या प्रथमचे विचार व स्मृतिसंगती ग्रथित झाल्या त्या आमच्या बंगाली भाषेला ऊर्जितावस्थेला आणण्याचें महत्त्व व अवश्यकता लवकरच सर्वसंमत झाल्याशिवाय राहाणार नाहीं.

असें म्हटलें तरी हरकत नाहीं, पण तसें तें असलें तरी त्याच्या प्रगतीच्या मार्गांत व्यत्यय येण्याचें कांहींच कारण नाहीं.

बहुभाषाकत्वाच्या निमित्ताचा मोठाच बाऊ करून दाखविण्यांत येतो. युरोपखंडांतील एखाद्या देशाप्रमाणें हिंदुस्थानास न मानतां त्यास युरोप खंडा-प्रमाणेंच समजलें पाहिजे युरोप खंडाचें सांस्कृतिक, धार्मिक व बौद्धिक ऐक्य जसें भाषैक्यावर अवलंबून नाहीं, तसेंच हिंदुस्थानचें समजावें. पुष्कळ वर्षांपूर्वीं सर्व युरोपभर देशी भाषांला न विचारतां जसें फक्त लॅटिनला महत्त्व देण्यांत येत असे, तसेंच हिंदुस्थानांत एका काळीं संस्कृतालाच प्राधान्य देण्यांत येई. पण युरोपची भरभराट लॅटिन एकभाषा असतांना झाली नाहीं. प्रांतिक भाषा जसजशा पोसत चालल्या तशतशी युरोपाच्या प्रांतिक भागांना नूतन जीवनकला भरूं लागली व कालांतरानें सर्व खंडच्या खंडच एकदम पूर्ण-त्वास व वैभवास चढलें. हें बहुभाषाकत्व युरोपच्या अभिवृद्धीला अथवा सांस्कृतिक ऐक्याला मारक न होतां उलट तारकच झालें आहे, ही गोष्ट कोणीही नजरेआड होऊं देऊं नये. एके ठिकाणीं या बाबतींत पुढील उतारा आढळला आहे—

21. When the great European countries found their individual languages, then only the true federation of cultures became possible in West, and the very differences of the channels made the commerce of ideas in Europe so richly copious and so variedly active."

बहुभाषाकत्वाची अडचण जर युरोप खंडाच्या वैभववृद्धीच्या आड आली नाहीं, तर ती हिंदुस्थानच्या आड तरी कां यावी ?

युरोप खंडाच्या व हिंदुस्थानच्या तुलनेंत फक्त एकच गोष्ट किंचित् भिन्न आहे व ती म्हणजे हिंदुस्थानांतील धर्मभिन्नत्व ही होय. वास्तविक ज्यानें

---

२१ जेव्हां युरोपांतील देशांच्या निराळ्या स्वतंत्र भाषा झाल्या, तेव्हां त्यांच्या निरनिराळ्या संस्कृतींचे संघटन संभवलें, आणि त्यांच्यामधील पर-स्पराभिन्नत्वामुळेंच युरोपांत विचार-व्यवहाराला इतकी विविधरूपी चालनासंपन्न विपुलता प्राप्त झाली.

त्यानें आपल्या धर्माचें परिपालन करून एकत्र राहण्यात कोणाचाही. कोणास प्रत्यवाय असूं नये, पण हा प्रश्न आज्ञीं स्वतंत्र आहे, त्याचा येथें विचार कर्तव्य नाहीं.

तेव्हां हिंदुस्थानांत निरनिराळ्या प्रांतांनीं आपापल्या प्रांतिक भाषा संपन्न करून त्यांचा संसार सुखेनैव चालूं द्यावा. कोणी कोणाचें वैषम्य मनांत येऊं देऊं नये. आणि बृहन्महाराष्ट्रांत मराठीनें आपला संसार चांगला रंगारूपास आणावा असेंच कोणीही म्हटल्यास त्यांत कांहीं वावगें होणार नाहीं.

वर जी युरोप खंड व हिंदुस्थान यांची तुलना केली त्यांत आणखी एक गोष्ट विचारांत घ्यावयाची राहून गेली आहे ती अशी कीं जरी युरोपांत बहुभाषा असल्या तरी त्याच्यावर परक्या संस्कृतीची राजसत्ता नसल्यामुळें युरोपाला आणखी अडचणी उत्पन्न झाल्या नाहींत. तसा प्रकार हिंदुस्थानचा नाहीं. हिंदुस्थानांत परकी राजसत्ता असल्यामुळें हिंदुस्थानला राजभाषा जवळ करणें प्राप्त आहे. आणि सर्व जगभर ज्याअर्थी इंग्लिश भाषेचा प्रसार झाला आहे, त्याअर्थी परराष्ट्रीय व्यवहारांतसुद्धां हिंदुस्थानाला इंग्रजी भाषाच जवळ बाळगावी लागणार आहे. राजकीय कामकाजांत पडणारांनीं, परदेशांशीं व्यवहार करूं इच्छिणारांनीं इंग्लिश भाषेचें अध्ययन अवश्यमेव केलें पाहिजे. पण म्हणून प्रांतिक भाषांच्या अभिवृद्धीकडे दुर्लक्ष करणें योग्य होणार नाहीं.

युरोप खंडाचें उदाहरण सोडून इतर देशांचीं घेतलीं तर काय निष्पन्न होतें, तें पहा ना ? स्वित्झर्लंड घ्या, युनायटेड स्टेट्स घ्या, किंवा युनियन ऑफ साउथ आफ्रिका घ्या.

या देशांत युरोप खंडाप्रमाणें, अथवा आपल्या हिंदुस्थानाप्रमाणें अनेक भाषा आहेत, तरी देखील त्यांच्या व्यवहाराला कोणत्याच प्रकारचा व्यत्यय येत नाहीं, किंवा त्यांचा उन्नतीचा मार्ग अडून राहत नाहीं. याचें कारण काय असावें बरें ? हिंदुस्थान व उपरिनिर्दिष्ट देश यांत फरक असेल तर तो एवढाच कीं त्या देशांत परकी राजसत्ता नाहीं. तेव्हां बहुभाषाकत्व हीं

एखाद्या देशाच्या उन्नतीच्या मार्गातील धोंड आहे असें म्हणणें योग्य होणार नाहीं. राजकीय व्यवहाराला त्यापासून खीळ पडते असेंही म्हणणें सर्वथैव बरोबर नाहीं.

तर मग काय ? हिंदुस्थानांतील तेरा प्रमुख भागांतून तेरा मुख्य भाषा चालत असतां या तेरा भागांच्या एकत्र विचारविनिमयास एक भाषा नकोच कीं काय ? असा प्रश्न साहजिक उद्भवतो.

या तेरा भागांचा आपसांत विचारविनिमय व्हावयाचा असता तर या तेरांतून हिंदीसारख्या एखाद्या सोइस्कर भाषेवर निर्वाह करतां आला असता. पण राजकाजाची भाषा तर निराळी अवश्यच पाहिजे. अनेक भाषा एखाद्या देशांत चालत असल्या तरी देखील सर्वसाधारण एक भाषा असलीच पाहिजे असें नाहीं. पण केव्हां ? त्याला एकच अट आहे. सर फ्रेडरिक व्हाइट म्हणतात,

22 "A common language, however, can only be dispensed with where the languages spoken in different parts in any particular country are, each and all of them, adequate vehicles of economic and political thought, not to speak of the higher literary forms necessary in the arts and letters."

म्हणजे निरनिराळ्या प्रांतिक भाषांत विद्वत्ता आणि कलाकौशल्यविषयक ग्रंथनिष्पत्तीला लागणारी सामुग्री नसली, तरी निदान अर्थशास्त्र व राजकारणशास्त्र यांतील अर्थवाहकता त्यांच्यामध्यें असेल तरच एक भाषेची तितकीशी अवश्यकता राहात नाहीं.

---

२२ कला व विद्वत्ता यांना अवश्यक असणारें उच्च वाङ्मयीस्वरूप जरी सोडून दिलें तरी अर्थशास्त्र व राजकारणशास्त्र यांतील विचारांना व्यक्त करण्याची शक्ति एखाद्या देशांतील प्रांतिक भाषांच्या ठिकाणीं जर असली तरच केवळ त्या देशाला राष्ट्रभाषेची अवश्यकता राहत नाहीं.

ही सर फ्रेडरिक व्हाइट साहेबांची कसोटी झाली. आतां ही कसोटी हिंदुस्थानांतील प्रांतिक भाषांना लावून ज्याची त्यानें पाहावयाची. हिंदुस्थानांतील प्रांतिक भाषांस जर इतकें सामर्थ्य प्राप्त झालें असेल, तर हिंदुस्थानाला देखील एका भाषेची आवश्यकता राहणार नाहीं; परंतु फ्रेडरिक व्हाइट यांच्या मतें इतकें सामर्थ्य हिंदुस्थानांतील कोणत्याही प्रांतिक भाषेंत नाहीं. म्हणूनच हिंदुस्थानाला एक भाषेची अवश्यकता आहे. व ती एक भाषा म्हणजे इंग्रजी भाषाच असली पाहिजे. सर साहेब म्हणतात कीं सगळ्या हिंदुस्थानची एक भाषा होण्याची पात्रता कोणत्याही प्रांतिक भाषेची नाहीं. हिंदुस्थानला प्रांतिक स्वायत्तता मिळून प्रांतिक भाषा आपल्या प्रांतापुरत्या कार्यकर्त्या झाल्या तरी देखील हिंदुस्थानांतील इंग्रजी भाषेचें सर्व सामान्य एकभाषेचें सिंहासन अढळच राहील.

पूर्वी आम्हीं प्रसंगानुसार बंगाली भाषेचा गेल्या ८० वर्षांतला जो इतिहास दिला आहे, तोच सर साहेबांनीं देऊन बंगाली भाषा आज प्रांतिक कारभार वहाण्याला लायक झाल्याबद्दल तिचें कौतुक केलें आहे, व बंगाली भाषेचें अनुकरण करून इतर प्रांतिक भाषा अशाच संपन्न होणें शक्य असून त्या आपापल्या प्रांतिक कारभाराचा बोजा वहाण्यास लौकरच समर्थ होवोत अशी आशाही दर्शविली आहे. पण हिंदुस्थानची राष्ट्रभाषा म्हणजे इंग्रजी भाषाच रहाणार असें त्यांचें म्हणणें आहे.

हिंदुस्थानची राष्ट्रभाषा हिंदी भाषा असावी असें म्हणणाऱ्यांनासुद्धां परराष्ट्रीय व्यवहाराला इंग्रजीची आवश्यकता कबूलच करावी लागेल. तेव्हां कोणच्याही प्रांतिक भाषेला आणि म्हणूनच मराठीला प्रांतिक भाषेच्या पलीकडे वाव व मान मिळेल कीं काय याबद्दलचें अनुमान त्या भाषेच्या सर्वगुणसंपन्नतेवर अवलंबून राहणार हें उघड आहे. आज बंगाली भाषा इतकी संपन्न असूनही तिची प्रांतिक भाषेपलीकडे योग्यता वाटत नाहीं. हिंदुस्थानच्या सर्व प्रांतिक भाषांपेक्षां तिला श्रेष्ठ मान आहे. याचें कारण तिची ओळख परराष्ट्रांना झाली आहे, आणि परराष्ट्रांत तिची ओळख

होण्यास काय कारण झालें ? तर त्या भाषेंत शास्त्रप्रवीण, मत्सद्दी, धर्मप्रवर्तक, व्याख्याते व लेखक व कवि निपजून ते कीर्तिमान झाले. त्यांच्या ग्रंथांचीं भाषांतरें इंग्रजींत झालीं. त्यामुळें बंगाली भाषेचें नांव सर्व जगाच्या कानावर गेलें. पण हे जे बंगाली भाषेचे जगमान्य ग्रंथकार झाले ते सर्व आपल्या मातृभाषेचे कट्टे अभिमानी असून त्यांनीं आपली ग्रंथरचना मूळ मातृभाषेंतच केली, आणि तिला सुसंपन्न बनविलें.

आज काल गुजराथी भाषा अशीच झपाट्यानें पुढें चालली असून हिंदी भाषा देखील नव्या दमानें पुढें पाऊल टाकीत आहे. कानडी भाषेंत नवचैतन्याचा संचार होऊं लागलाच आहे. आणि इतर लहान मोठ्या भाषा देखील आपलें कार्यक्षेत्र आंखूं लागल्या आहेत. अशा वेळीं मराठीनें या शर्यतींत मागें पडून चालणार नाहीं. मराठीची परंपरा उज्वल आहे. मराठीनें आपल्यांतील वैगुण्यांचा व अडचणींचा विचार करून त्या सर्व नाहींशा करण्याच्या मार्गास लागलें पाहिजे. मराठीला प्रतिस्पर्धी जेव्हां संस्कृत होती तेव्हांपासून म्हणजे अगदीं बाल्यावस्थेपासून ती आपलें श्रेष्ठत्व सिद्ध करीत आली आहे हें सर्व संतांचे ग्रंथ पाहिल्यास आढळून येईल.

मराठी भाषेच्या अभिवृद्धीला वैयक्तिक व सामुदायिक दोन्ही प्रयत्नांची गरज आहे. श्रीमान लोकांनीं, संस्थानिकांनीं, संस्थांनीं आणि सरकारनें तिला जोपासिली पाहिजे. परंतु पहिल्या तिघांवर तिला हाताशीं धरण्याची जबाबदारी अधिक पडत आहे.

सर फ्रेडरिक व्हाइट इंग्रजी भाषा ही हिंदुस्थानची राष्ट्रभाषा व्हावयास पाहिजे असें म्हणतात, तरी प्रांतिक भाषा मरणोन्मुख होणें म्हणजे प्रांताचा व पर्यायानें हिंदी राष्ट्राचा तो घातच होतो असें म्हणतात.

तात्पर्य काय कीं, हिंदुस्थानचे राष्ट्रधुरीण ज्या राष्ट्रोन्नतीकरितां एकसारखे झटत आहेत, त्याचा पाया देखील भाषेच्या उन्नतीवर आहे. भाषावार प्रांतरचना व्हावी ही एक राष्ट्रहितसाधकांची मागणी आहे, ती सर्वथैव योग्य आहे. हल्लीं उत्तर हिंदुस्थानांत देखील वस्ती करून राहिलेल्या महा-

राष्ट्रीय लोकांत आपल्या मायभाषेची व मातृभूमीची कळकळ उत्पन्न होऊन जागृति झालेली दिसूं लागली आहे, हें मराठी भाषेचें भाग्यच समजावयाचें. ज्या ज्या ठिकाणीं महाराष्ट्रीयांची वस्ती असेल त्या त्या ठिकाणीं संघ व क्लब स्थापन करून मराठी भाषेच्या उन्नतीप्रीत्यर्थ आठवड्यांतून एक तास तरी चर्चा होऊन त्या दिशेनें कांहीं कांहीं कार्य करीत राहिल्यास मराठी भाषेच्या संसारास दुमदारपणा आल्याशिवाय खास रहाणार नाहीं. हें बाहेरच्या लोकांनीं करावयाचें कार्य झालें. पण प्रांतस्थ लोकांना तर हा जिव्हाळ्याचाच प्रश्न समजून चाललें पाहिजे. आपल्या वंगबंधूंनीं जर आपल्या मातृभाषेस इतक्या थोड्या अवधींत इतक्या स्पृहणीय ऊर्जितावस्थेस चढविलें आहे, तर महाराष्ट्रीयांना तरी ती गोष्ट अशक्य कां वाटावी ? बंगाली भाषेला आतां ' A new status and a classical dignity " प्राप्त झालेली आहे. आणि ही गोष्ट त्या भाषेचे एतद्देशीय व परदेशीय प्रतिपक्षीदेखील निःसंदेहपणें कबूल करूं लागले आहेत हा त्या भाषेचा अपूर्व दिग्विजय म्हटला पाहिजे. सर फ्रेडरिक व्हाइट साहेब म्हणतात कीं,

23 "If the revival of Bengali Patriotism, under whatever influences, has produced the result described above; and if, in each Indian Province in its own appropriate manners, a similar renaissance takes place, accompanied as it must be by a growth in self respect, then foundations will have been laid for success in the enterprise of provincial self-government ... ... ... ... The spirit of that renaissance when grown to its full stature, will be the life-blood of Provincial Self-government."

---

२३ कोणत्याही कारणांनीं असो, पण पुनर्जात बंगाली राष्ट्राभिमानामध्यें जर का वर वर्णन केलेल्या परिणतीचा उगम असेल, व त्याला साजेल अशा विशिष्ट स्वरूपांत हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांत जर तशीच जागृति-- व ह्या जागृतीबरोबर स्वाभिमानाची वाढही होत असतेच—होत असेल, तर प्रांतिक स्वायत्ततेच्या धाडसी कृत्याच्या विजयाचा पाया घातलाच म्हणावयाचा ........या जागृतींतील प्राणतत्वाची जेव्हां पूर्ण वाढ होईल तेव्हां प्रांतिक स्वायत्ततेच्या शरीरांत रक्ताचा पुरवठाही झाल्यासारखा होईल.

" स्वराज्य " " स्वराज्य " म्हणून देशकार्यासाठीं तळमळणाऱ्या पुढाऱ्यांना देखील हे शब्द फार मननीय वाटतील असें वाटतें, परंतु सर्वच स्वराज्येच्छु पुढारी स्वभाषेकडे दुर्लक्ष करितात असें मुळींच म्हणणें नाहीं. उलटपक्षीं हिंदुस्थानांतील खऱ्या पुढाऱ्यांच्या चरित्राकडे नजर फेंकल्यास त्यांनीं मातृभाषेंत उत्तम वाङ्मयाची भर घालून मातृभाषेची सेवा मातृभूमीच्या सेवेइतकीच पवित्र मानल्याचें आढळून येईल. महाराष्ट्रीय पुढाऱ्यांनीं देखिल या बाबतींत बराच पुढाकार घेतल्याचें दिसून येतें व त्याबद्दल खरोखर समाधान वाटतें. सामान्य जनतेच्या लक्षांत मात्र ही मातृभाषेच्या महत्त्वाची गोष्ट यावी तशी येत नाहीं म्हणून ह्या मुद्याचा येथवर जरा विस्तृत विचार केला आहे.

---

# प्रकरण ९ वें.

## आक्षेपांचें निरसन.

मराठीचा सर्रास उपयोग होणें अशक्य आहे, असें प्रतिपादन करणारा एक पक्ष आहे व या पक्षाचे कांहीं आक्षेपही आहेत. या आक्षेपांचा विचार केल्याशिवाय या विवेचनाला पूर्णता येणार नाहीं. या आक्षेपांचे स्थूल दृष्टीनें दोन भाग पाडतां येतील. एक प्रकाशनविषयक व दुसरा लेखनविषयक. आतां प्रथम प्रकाशनविषयक आक्षेपांचा विचार करूं.

प्रकाशनविषयक आक्षेपांत पहिला व मुख्य आक्षेप असा कीं, मराठीची वर्णमाला मुद्रणसौकर्यास प्रतिकूल आहे. एक शब्द जोडावयाचा झाल्यास, त्याची ऱ्हस्वदीर्घ रचना, त्या रचनेनुसार काना, मात्रा वेलांट्या व अनुस्वार वगैरे उपांगें व शिवाय जोडाक्षरें इतक्या अवांतर गोष्टींकडे लक्ष पुरवावें लागतें व तितके खिळे एकत्र आणावे लागतात. वस्तुस्थिति अशी आहे खरीच. अखंड टाइपांचा नमुना आतां तयार झाला आहे. पण हे

अखंड टाइप फार काळ टिकत नाहींत, ते लवकर मोडतात असें म्हणतात. पण तज्ज्ञ गृहस्थांस ही तक्रार दूर करतां येणार नाहीं असें नाहीं. मराठी शब्दांच्या ह्या कानामात्रादि अंगप्रत्यंगांमुळें इंग्रजी शब्दांची एक ओळ जोडण्यास जितका वेळ लागतो, तितक्या वेळांत मराठीची अर्धीही ओळ जोडणें कठीण जातें. परंतु टिकाऊ असे अखंड टाइप झाले, तर ही अड-चण दूर होणें शक्य आहे.

मराठी भाषेच्या ह्या विशिष्ट घडणीमुळें मराठीच्या छपाईत मूळ लेखन शुद्ध असूनही टाइप जुळविणारांच्या अज्ञानामुळें पुष्कळच मुद्रणदोष घडत असतात. इंग्रजी पुस्तकांशेजारीं एखादें मराठी धरून एखादे इंग्रजीचे चहाते विद्वान गृहस्थ " ही पहा आपली मराठी छपाई ! " असें उपहासानें म्हण-तांना बहुधा आढळतात. या गोष्टीलाही उपाय आहे. मराठी मुद्रणालयांत अशिक्षित मुद्रकांचीच ( मुद्रा जुळविणाऱ्यांची ) सामान्यतः खोगीरभरती झालेली असते. शिवाय या लोकांनीं मराठी भाषेचें पायासुद्ध शुद्धाशुद्ध लेखनाबद्दलचें ज्ञानही मुळींच मिळविलेलें नसतें. यासाठीं इतर धंद्यांप्रमाणें मुद्रणकलेचा धंदा हा स्वतंत्र मानून त्याचा अभ्यासक्रम शक्य तितका लौकर आंखला जाणें इष्ट आहे. या गोष्टीकडे आतां काणाडोळा करून मुळींच चालावयाचें नाहीं. या शिक्षणक्रमांतून पास झालेला विद्यार्थीच मुद्र-णालयांत नोकरी करण्यास लायक ठरला जावा. शिवाय या उमेदवारांना मुद्रणकलेच्या सौंदर्याचें भरपूर ज्ञान करून दिलें पाहिजे. पुणें अथवा मुंबई येथें अशा मुद्रणकलेची संस्था एखाद्या बड्या छापखान्यामार्फत अथवा प्रेस असोसिएशनमार्फत सुरू करण्यांत यावी, आणि वाटेल त्या उपायांनीं मराठी मुद्रणकलेला जगाच्या व्यवहारांत कोठेंही मान खालीं घालावी लागणार नाहीं असें सौंदर्य प्राप्त करून देण्याचे परिश्रम करावेत. हल्लीं महाराष्ट्रांत कांहीं छापखाने सुंदर कामें करूं लागले आहेत हें खरें; पण इतर बाबतींतल्या-प्रमाणें या बाबतींत देखील वैयक्तिक प्रयत्नांपेक्षां सामुदायिक प्रयत्नच अधिक यशस्वी ठरणार हें निश्चित होय.

लेखनविषयक अडचणींचा विचार करतां सकृद्दर्शनीं अवघड दिसणाऱ्या अडचणी थोड्याशा विचारांतीं परिहरणीय दिसूं लागतील.

जगाच्या भाषांतील लिपींत मराठी लिपीला ध्वनिसदृश वर्णानुकूलता जशी आहे, तशी क्वचितच् इतर भाषेला असेल. विशेषतः परदेशीय भाषांत तर ती तशी सांपडणें सुतराम् दुर्घट आहे. मग मराठीच्या केवळ वर्णांच्या कमी अधिक उपांगदुर्बोधकतेच्या दोषांच्या राईचा पर्वत करून दाखविणारांनीं तिच्या ह्या गुणामुळें तिला प्राप्त झालेल्या लेखनसुलभतेकडे दुर्लक्ष करून कसें बरें चालेल ? जोडाक्षरें, ऱ्हस्वदीर्घ, अनुस्वार वगैरे ज्या गोष्टी अवघड वाटतात त्याही नियमबद्धतेनें सुलभ करण्याचे प्रयत्न आतां झाले पाहिजेत. परंतु मराठीचें अखेरपर्यंत पायाशुद्ध पुरें शिक्षण न होतांच इंग्रजींत लक्ष घात ल्यामुळें सध्याच्या पिढीला या गोष्टी इतक्या भेवडावति आहेत. निदान मॅट्रिकपर्यंत जरी संस्कृत व मराठी या दोन्ही भाषांचें पुरें शिक्षण झालें तर मराठी भाषेच्या अनियमितपणाचा बाऊ आतांच्या सारखा वाटूं लागणार नाहीं.

मराठी लिहिणें अवघड व कालहरण करणारें आहे. बालबोध लिपी तशी आहे असें धरून चाललें ( वास्तविक संवयीनें व पायाशुद्ध अभ्यासानें तशी वाटत नाहीं हें वर सांगितलेंच आहे ) तरी लेखनाकारितां मोडी लिपी आहे हें स्मरणांत कां नसावें ? ती तर अत्यंत दुर्बोध आहे असें म्हणावयाचें असेल, तर इंग्रजी लेखनलिपी तितकीच दुर्बोध नाहीं काय ? परंतु बालबोध लिपीचाच जेथें पुरासा अभ्यास होत नाहीं, तेथें मोडीची आठवण होते आहे कोणाला ? प्रस्तुत लेखकाला असे कांहीं बडे पदवीधर माहीत आहेत कीं त्यांना मराठींतील बालबोध लिपीही शुद्ध लिहितां येत नाहीं. आणि मोडीची तर आजन्मांत ओळख नाहीं ! आणि दुर्दैवाची गोष्ट अशी कीं या जाड्या विद्वानांची मातृभाषा मराठी बरें ! दुर्दैव बिचाऱ्या मराठीचें ! प्रस्तुत शिक्षणपद्धतीमुळें मराठीच्या संसाराचा असा बोजवारा उडाला आहे. प्रत्यक्ष आईची ओळख लेंकराला नसावी, यापेक्षां दैवहीन-

तेची दुसरी कोणती गोष्ट संभवनीय आहे ? आपलीं मुलें– जन्मल्याबरोबर ज्यांना कुरवाळलें तीं आपलीं मुलें–शिक्षणाचे संस्कार होतांच आपणाला साफ विसरून चाललीं आहेत हें पाहून कोणत्या मातेचें काळीज तुटल्या· शिवाय राहील ? मराठीचें हें हतभागधेय यापुढें तरी टळेल काय ?

परीक्षेचीं उत्तरें मराठींतून लिहावयास परवानगी मिळाली ही खरोखरीच चांगली व इष्ट गोष्ट झाली आहे. तथापि कांहीं लोकांचा आक्षेप असा आहे कीं मराठींतून उत्तरें लिहावयाचीं तीं मोडी फार दुर्बोध म्हणून मोडी त्याज्य ठरल्यावर, बाळबोधींत लिहिणें किती तरी कालहारक व शुद्धाशुद्ध- तेकडे लक्ष पुरविण्यास भरपूर वेळ नसल्यामुळें हानिकारक ठरणार आहे. या आक्षेपाबद्दल सामान्य विचार वर करण्यांत आलेला आहे. पण परीक्षे- च्याच दृष्टीनें आतां या प्रश्नाकडे आपण पाहूं.

विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर मनांत आणावयाचें–तें आपल्या मातृभाषेंत आणावयाचें आणि मनांतल्यामनांत त्याचें भाषांतर परकी भाषेंत करून तें उत्तरपत्रिकेवर उतरावयाचें ! ही क्रिया अगदीं जलद होत असेल, नाहीं बरें ? आणि या क्रियेंत अस्वाभाविकता मुळींच नाहीं का ? शिवाय ही परकी भाषा जशी कांहीं विद्यार्थ्यांच्या तळहातावरचा मळच असेल कीं विचारासाठीं ती त्याच्या अंतःकरणांत, उच्चारासाठीं ती त्याच्या जिव्हाग्रावर व लेखनासाठीं ती त्याच्या नखाग्रावर सारखी नाचूं लागावी ! मातृभाषेंत मनांत जे विचार येतील ते परकी भाषेंत उतरतांना, ते तसे उतरीत असतां आपली भाषा चूक आहे कीं काय हें पहातांना, शिवाय ज्यांच्या उच्चाराचा वर्णमालेशीं अतिशय अनियमित संबंध असतो अशा शब्दांचीं स्पेलिंगें लिहितांना वेळ मुळींच लागत नाहीं काय ? मातृभाषेंतून जर वर दर्शविल्या- प्रमाणें मूळपासूनच पायाशुद्ध शिक्षण झालें, तर बालबोध मराठींत उत्तरें लिहावयास वरच्यापेक्षां जास्त वेळ लागेल काय ? आणि लागेल असें जरी धरून चाललें, तरी वाक्यरचना, भाषापद्धति, विचारसरणि व मनांतील आशय अधिक समर्पक कोणत्या भाषेंत आणि कोणत्या तऱ्हेनें व्यक्त होईल

बरें ? याचा विचार अविकृत दृष्टीनेंच प्रत्येकानें आपल्याशीं करणें जरूर आहे.

मराठी भाषेंत कांहीं बाबतींत अनियमितपणा असेल, नाहीं असें नाहीं. पण तसा तो कोणत्या भाषेंत नाहीं ? असल्या कांहीं अनियमित गोष्टींमुळें भाषाच निरुपयोगी ठरते कीं काय ? शिवाय मराठी भाषेचे व्यासंगी लेखक आतां मराठीच्या व्याकरणनियमांवर, विशिष्ट धातुसाधित स्वरूपांवर, अनुस्वाराच्या उपयोगावर, ऱ्हस्वदीर्घांच्या व जोडाक्षरांच्या पद्धतीवर चर्चात्मक लेख लिहून भाषेला अधिक नियमित करण्याच्या उद्योगाला लागले आहेत हें मराठी भाषेंतील नियतकालिकांच्या वाचकाला सांगावयास नकोच. निरनिराळ्या शास्त्रांवरील ग्रंथरचनेच्या सोईकरितां त्या त्या शास्त्रांतील वाक्प्रचारांची परिभाषा ठरवून टाकली पाहिजे. याविषयीं उल्लेख पूर्वीं एकवार करण्यांत आलेला आहे. तथापि आम्ही सुचविलेल्या कार्यास हात घालणें किती जरूर आहे हें आजच ( ११।७।२६ ) हातीं आलेल्या केसरीच्या ६ जुलई १९२६ च्या अंकांतील श्री. अ. ब. कुमठेकर यांच्या "महाराष्ट्रिय रासायनिक सभा" या लेखावरून दिसून येतें. रसायनशास्त्राची मराठी परिभाषा अद्याप ठरलेली नाहीं व ती एकवार ठरवून टाकण्याची निकड आतां महाराष्ट्रीय संशोधकांस भासूं लागली आहे. यावरून एवढेंच ठरतें कीं मराठी भाषेचें तिच्या संसारांत, जसजसें पुढें पाऊल पडून तिला स्वातंत्र्य मिळत जाईल, तसतसा तिच्या संसाराला सर्वांगसुंदरपणा येऊन ती खुलूं लागेल. तिचे सुपुत्र आतां जागृत झाले आहेत. तिच्या वाढत्या जीवन शक्तीच्या व्यवहाराला पायबंद न घालतां अधिकाधिक वाव देत गेल्यास ती कार्यकर्ती व व्यवहारक्षम होत जाईल, यांत तिळमात्र शंका नको. साधारणपणें कच्च्या दिलाला भासणाऱ्या शंका केवळ भास आहेत. नेटानें कार्यास लागल्यावर असल्या अडचणी सहज दूर करतां येण्यासारख्या आहेत म्हणून असल्या किरकोळ गोष्टींस बुजून न जातां मराठीला बोधभाषेचा मान सत्वर मिळणें अवश्य आहे.

---

# प्रकरण १० वें.

## पद्य आणि गद्य.

" पृथ्वीवरील संपन्न व समर्थ भाषांपैकीं मराठी ही एक आहे. तिची प्राचीन काव्यसंपत्ति अलौकिक आहे व हीच तिच्या श्रीमंतीचें आद्यकारण आहे. " हे प्रो. पोतदार यांनीं आपल्या " मराठी गद्याचा इंग्रजी अवतार " या पुस्तकाच्या आरंभीं अगदीं " श्रीगणेशा " लाच काढलेले उद्गार आम्हांस अक्षरशः खरे वाटतात. मराठी वाङ्मय प्रभावी आहे व तें अधिक प्रभावी व्हावयाच्या मार्गास लागलें आहे. आतांपर्यंत त्याच्यावर अगणित गंडांतरें आलीं आहेत, व अजूनही येत आहेत, पण त्यांना न जुमानतां त आपला उन्नतीचा पंथ अखंड आक्रमीत राहणार आहे. " **मराठीचा संसार** " सजविण्याकरितां तिच्या सुपुत्रांनीं तनमनधन तिच्या प्रीत्यर्थ अर्पण केलें आहे.

ज्ञानेश्वरी लिहितांना श्रीज्ञानेश्वर महाराजांना किती आत्मविश्वास होता हें त्यांच्या शब्दांवरूनच स्पष्ट दिसतें.

" माझा मऱ्हाठाचि बोलु कौतुकें । परी अमृतातेंही पैजेसि जिंके । ऐसीं अक्षरें रसिकें । मेळवीन ।.........तैसें शब्दाचें व्यापकपण । देखिजे असाधारण । पाठेयां भावज्ञां फावति गुण । चिंतामणिंचे ॥ "

मराठी भाषेंतील शब्दांत हे गुण आहेत असें ज्ञानेश्वरीच्या वाचकांस खात्रीनें वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

स्वराज्य स्थापनेच्या पूर्वीं ज्ञानोबादि जें संत-मंडळ उदयास आलें त्यानें स्वराज्य, स्वधर्म आणि स्वभाषा यांच्या उद्धारार्थ जे प्रयत्न केले त्यांचें महत्त्व वर्णावें तेवढें थोडेंच होईल. त्यांचें त्यावेळचें कार्य पुरें झाल्यावर अर्थात् त्यांच्यापासून सुरू झालेली परंपरा व संप्रदाय निष्क्रिय झाला, त्याला कोणाचा इलाज नाहीं, म्हणून त्या आद्यप्रवर्तकांच्या कर्तृत्वतेला मुळींच बाध येत नाहीं. असें असतां, वेळीं अवेळीं, अविचारी शिक्षितांनीं त्यावेळचे

संत म्हणजे " ग्यानबा तुकाराम " म्हणून नाचणारे, क्रियाशून्य, टाळकुटे, दैववादी, प्रयत्नवादाचा नायनाट करून महाराष्ट्राला अवनत करणारे आळशी वारकरी होत, " असा आरोप करणें म्हणजे परमेश्वराच्या घरीं अक्षम्य गुन्हा करणें होय. वर म्हटलें आहे कीं, संतांनीं स्वधर्म, स्वराज्य व स्वभाषा यांच्याकरितां अमर्याद सायास त्यावेळीं केले. यांपैकीं महाराष्ट्र भाषेपुरताच विचार करावयाचा झाल्यास या संतमालिकेंतून कांहीं नांवें वगळावीं लागतील. कारण, उत्तर हिंदुस्थान व पूर्व हिंदुस्थानांतील संतांचे श्रम व कामगिरी हिंदी भाषेंतली आहे. त्यांच्या कार्याचा आत्मा एकच असला तरी पेहराव दक्षिणी संतांहून भिन्न होता. तेव्हां नानक, चैतन्य, रामानंद, कबीर, तुळशीदास, सूरदास, जयदेव, रोहिदास वगैरे संतांच्या कार्यानें हिंदी भाषेस नूर चढविला.

आपल्या महाराष्ट्र भाषेच्या संसाराचा डौल वाढविला ते संत म्हणजे ज्ञानदेव, निवृत्ति, सोपान, मुक्ताबाई, चांगदेव, नामदेव, जनाबाई, आकाबाई, वेणूबाई, एकनाथ, रामदास, तुकाराम, शांति बहामनी, दामाजी, उद्धव, भानुदास, कुमारदास, बोधलेबोआ, संतोबा पवार, केशव स्वामी, जयराम स्वामी, नरसिंह सरस्वती, रंगनाथ स्वामी, चोखा मेळा, गोरा कुंभार, राखा कुंभार, सांवता माळी, बहिरंभट, गणेश नाथ, जनार्दनपंत, मुधोपंत वगैरे होत. ही मालिका येथें पुरी देणें शक्य नाहीं. जें कार्य रा॰ म. भा. भू. ज. र. आजगांवकरांसारख्या खंद्या व चिकाटीच्या साहित्यसेवकास आज इतक्या वर्षांच्या खटपटीनेंहि अद्याप पुरें करतां आलेलें नाहीं, तें येथें चार ओळींत पुरें कसें करतां येईल ? महाराष्ट्र भाषेच्या संसार—मंदिरांत काव्याच्या खणांत ज्यांनीं चिरसौंदर्य भरून ठेवलें त्यांचें संमेलन भरवून त्या मंदिरांत श्रीयुत आजगांवकरांनीं आपलेंही नांव खोदून ठेवलें आहे. ह. भ. प. पांगारकर यांचीही या बाबतींतील कामगिरी वर्णनीय आहे. या संतांची कामगिरी अवर्णनीय होती असें जें आम्ही म्हणतों त्याला कै. न्यायमूर्ति

माधवरावजी रानडे यांच्याही म्हणण्याचा आधार आहे. ह्या संतांनीं काय केलें? न्या. रानडे म्हणतात—

24 "... ... ... They spent all their energies in the cultivation and growth of their mother tongue. It may safely be said that the growth of the modern Vernaculars in India is solely the result of the labours of these saints and that the provinces, which showed most docided tendencies in the way of reform, also showed the most healthy development of their vernacular literature."

वरील संतांनीं सुरू केलेली महाराष्ट्र भाषेच्या वाङ्मय–वृद्धीची परंपरा बदललेल्या परिस्थितींतून एकसारखी पुढें चालत राहिली ती पेशवाईच्या अखेरीपर्यंत. या एवढ्या काळांत जरी कांहीं थोड्याशा बखरी निर्माण झाल्या, तरी त्यांत पद्य वाङ्मयाचीच सारी भरताड असल्यामुळें त्याला कै. वा. वि. कों. ओक " मराठी वाङ्मयाचा पद्य काल " असें म्हणात, व तें अगदीं खरें आहे. भाषासरणी, विचारसरणी व ग्रंथरचना वगैरे गोष्टींचा बारीक विचार केल्यास या कालाचे, तीन किंवा अधिक पोटभेद पडूं शकतील हें खरें आहे; तथापि **ज्ञानदेव-मुकुंदराजांपासून तों प्रभाकर रामजोशांपर्यंतचा** हा काल म्हणजे सरासरी १२१२ पासून तों १८१८ पर्यंतच्या अजमासें सहा शतकांचा काल हा पद्यकालच म्हटला पाहिजे. आणि यानंतर आतांपर्यंतचा हा **गद्यकाल** म्हटला पाहिजे. ह्या गद्यकालांत देखील दोन पोटविभाग पाडतां येतील. १८२० पासून १८७० पर्यंतचा एक पोटविभाग व १८७० ते १९२० पर्यंतचा दुसरा पोटविभाग.

---

२४ त्यांनीं ( संतांनीं ) आपल्या शक्तीचा उपयोग आपल्या मातृभाषेच्या अभिवृद्ध्यर्थ केला. हल्लींच्या प्रांतिक भाषांची प्रगति हा केवळ या साधुसंतांच्या प्रयत्नांचा परिपाक होय असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं, आणि ज्या प्रांतांच्या मातृभाषेच्या वाङ्मयांत स्पृहणीय वाढ झालेली दिसूं लागली, त्याचेंच पाऊल प्रगतिपथावर दृढ होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं.

पैकीं पहिल्या विभागांतील लेखक जोरकस असले तरी त्यांना भाषांतरकार्य व संदर्भग्रंथ रचावयाचें कार्य करावें लागलें. त्यामुळें त्यांना स्वतंत्र ग्रंथ-रचना करावयास फुरसत मिळाली नाहीं व तशी त्यांना परिस्थितिही मिळाली नाहीं. या पाहिल्या काळांत बाळशास्त्री जांभेकर, दादोबा पांडुरंग, हरि केशवजी, सदाशिव काशीनाथ छत्रे, गोविंद नारायण माडगांवकर, महादेवशास्त्री कोल्हटकर इत्यादि लेखक पुढें सरसावले आणि दुसऱ्या कालांत विष्णु परशुराम रानडे, विष्णु मोरेश्वर भिडे, **गोपाळराव हरि देशमुख, कृष्णशास्त्री चिपळूणकर, विष्णु शास्त्री चिपळूणकर, गोपाळराव आगरकर** वगैरे प्रमुख लेखकांनीं महाराष्ट्रदेश आपल्या दणदणीत स्वतंत्र लेखांनीं दणदणून सोडला आणि खडबडून जागा केला. त्यांतही देशमुख (" **लोकहितवादी** ) " , पितापुत्र चिपळूणकर आणि आगरकर हे प्रमुख होत. तथापि या विषयींची विशेष विस्तृत माहिती देण्याचें स्थळ हें नव्हे. मराठीचा संसारक्षेम नीट चालावयास मातृभाषेची भक्ति आंतून व बाहेरून सारखी झाली पाहिजे. मराठीच्या आजपर्यंतच्या पुरस्कर्त्यांनीं तिच्या उद्धारार्थ सर्वस्व अर्पण केलें आहे. तिला श्रेष्ठ स्थान प्राप्त करून देण्यासाठीं झटत असतां व तशा प्रकारचे परिश्रम करतां करतांच ती आपली आशा अपुरी ठेवून त्यांनीं परलोकप्रयाण केलें आहे. त्यांच्या मागून ज्या पिढ्या आतां अस्तित्वांत येत आहेत, त्यांच्यावर त्या पूर्वजांची आशा पुरी करण्याची जबाबदारी आहे. श्रेष्ठ भाषांच्या पंक्तीस मराठीस बसवण्याची खटपट आजच्या साहित्यसेवकांनीं करावयाची आहे.

परंतु आजकाल विपरीत शिक्षणपद्धतीमुळें सर्वच मनु पालटला आहे. पूर्वी जरी आतांसारखी विपुल साधनसामुग्री व नव्या नव्या सुलभ शिक्षण-पद्धति अस्तित्वांत नव्हत्या, तरी आपल्या जुन्या वाङ्मयाची ओळख विद्यार्थ्यांस संसारांत पडावयाच्या पूर्वींच होत असे. त्यावेळीं बखरीच कायत्या होत्या. ऐतिहासिक व संतचरित्रांच्या बखरींचें वाचन दरघरीं दरवाड्यांत नियमानें होत असे. आज जें वाङ्मय बी. ए. च्या परीक्षेकरितां नेमतात,

त्या व तसल्या काव्यांचा व बखरींचा परिचय साधारण मनुष्यासदेखील त्या काळीं सहजासहजीं होई. परंतु आतां त्याच्या दशांश देखील आपल्या वाङ्मयाची ओळख साधारण विद्यार्थ्यांस होत नाहीं. हें लिहिण्याचें कारण असें कीं; मराठी वाङ्मयाचा अभ्यास जो करावयाचा तो शाळेच्या अभ्यासक्रमांतून होईल तेवढाच असें समजून घरच्या वडील माणसांनीं स्वस्थ बसावयाचें नाहीं. रात्रौ तास दोनतास जुन्या वाङ्मयाचें वाचन व त्याच्याबरोबर दिवसा नव्या वाङ्मयाचें वाचन सवडीनुसार प्रत्येक कुटुंबांत नियमानें सर्वांनीं मिळून एकत्र करण्याचा प्रघात पाडणें इष्ट आहे.

हल्लींच्या शिक्षणक्रमाच्या बाबतींत पालकांवर देखील एकप्रकारची जबाबदारी पडते. मातृभाषेंतून शिक्षण आपल्या मुलांस मिळविण्याची पालकांची इच्छा सरकारच्या नजरेस आली पाहिजे. "ज्ञानप्रकाश" च्या २५ जुलई १९२६ च्या अंकांत ने. ना. श्रीनिवास शास्त्री यांचें प्रसिद्ध झालेलें भाषण या बाबतींत मनन करण्यासारखें आहे.

मराठीच्या प्रोत्साहनास प्रारंभ मिशनऱ्यांचे हस्तें झालेला आहे. अर्थात् गद्यमराठीस सुरवात व्हावयाच्या आरंभास ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं बरीच खटपट केली आहे. म्हणजे या पुस्तकाच्या आरंभीं जी बंगालची स्थिति वर्णन केली आहे, तशीच स्थिति महाराष्ट्रांत घडलेली आहे. देशी विरुद्ध इंग्रजी भाषेचा झगडा त्याच सुमारास महाराष्ट्र म्हणजे मुंबई प्रांतींही सुरू होता. आणि त्यावेळीं मराठीचीं लेंकरें इंग्रजीचें दूध पिऊन आपल्या आईस विसरत चाललीं होतीं. इतकेंच नव्हे, तर प्रेमसंन्यास नाटकांतील बॅरिस्टराप्रमाणें "मराठी" हा शब्द शिवी समजला जाण्याइतका तिरस्करणीय गणला गेला होता. शेक्सपिअर, विल्सन एका बाजूला तर मेकॉले-ट्रिव्हेल्यन दुसऱ्या बाजूला ! आणि बंगाल्यांतील राम मोहन रॉयप्रमाणें महाराष्ट्रांत फिरोजशहा मेथासारखे कळकळीचे देशसेवक देशी भाषांच्या विरुद्ध आणि इंग्रजीचे पाठिराखे ! राम मोहन रॉय यांच्यासंबंधीं आमचें मत पूर्वीं आम्ही नमूद करून ठेवलेंच आहे. त्यांना जसें नांव ठेवण्यांत हांशील नाहीं, तसेंच

फेरोजशहा मेथांस देखील कोणी नांव ठेवण्यास धजणार नाहीं. फेरोजशहा म्हणतात.– ”......

25 We cannot too strongly condemn the spasmodic efforts to create, on short notice, a vernacular literature or rather vernacular literatures ! ”

त्या काळीं वाङ्मयभरतीचे जे प्रयत्न होत होते, त्यानंतर मेथासाहेबांचा हा खासा अभिप्राय ! मेथा कळकळीचे देशभक्त खरे, पण देशीभाषांबद्दल त्यांनीं असे उद्गार काढावयाचे नव्हते. परक्यांनीं उणें बोललेलें तितकें लागत नाहीं, कारण तें अपेक्षिलेलेंच असतें, पण आपल्याच घरांतल्या माणसांनीं उणें बोललेलें अधिक लागतें.

याच्यानंतर मुंबई, मद्रास, कलकत्ता या ठिकाणीं विश्वविद्यालयें स्थापन झालीं. आणि सर्वसाधारण विद्याप्रसाराबरोबर देशी भाषांस जें कांहीं स्वकल्याण साधतां येण्यासारखें होतें, त्यांतच मराठीनें आपलें डोकें पुनः वर काढावयास सुरवात केली.

मराठी वाङ्मय बोधभाषा होण्याला नालायक मानण्याइतकें कमकुवत नाहीं असें आम्ही आज म्हणतों. पण कै. वा. ओक १९०६ सालींच म्हणून गेले कीं, “ **आपलें वाङ्मय लहान नाहीं. फार मोठें आहे. तो समुद्र आहे.** ” यावरून त्यांना कोणी कूपमंडूक वृत्तीचे मानील पण तें योग्य होणार नाहीं; कारण इतकेंच लिहून ते थांबते तर त्यांच्यावर वरच्यासारखा आक्षेप घेतां येण्यासारखा होता. पण ते इतके आकुंचित दृष्टीचे नाहींत. ते म्हणतात “ तो समुद्र आहे. आणि तो पाहिजे तितका वाढवितां येण्यासारखा आहे. तो वाढविण्यास इंग्लिश वाङ्मयासारखा साह्यकारी

---

२५ देशी भाषांतील वाङ्मयनिर्मितीसाठीं मधून मधून होणाऱ्या या प्रयत्नांचा धिक्कार करावा तेवढा थोडाच !

देवानें आपल्यास आपल्या घरांत आणून दिला आहे. " यावरून कोणालाही कळून येईल कीं इंग्लिश वाङ्मयाचा चांगलाच परिचय बालबोधकर्त्यांस होता. आणि असें असून देखील ते आपल्या मराठी वाङ्मयास १९०६ सालीं समुद्र—फार मोठा समुद्र— म्हणत आहेत. १९०६ पासून १९२६ पर्यंतचीं वीस वर्षें म्हणजे मराठी वाङ्मयांत अत्यंत महत्त्वाचीं गणलीं जातील. हा एक स्वतंत्र काल कल्पून लिहूं गेल्यास या वीस वर्षांच्या मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचा केवढा तरी प्रचंड ग्रंथ होईल व तो रम्य, स्फूर्तिप्रद आणि भावी यशाची खंबीर आशा उत्पन्न करणारा असा होईल. ही वीस वर्षांत पडलेली अमूल्य भर जमेस धरली तर मराठी बोधभाषा होण्यास अपात्र, कॉलेजच्या सर्व परीक्षांस अपुरती असें मुळींच वाटावयास नको. मात्र कसून खटपट झाली पाहिजे.

वर आधुनिक कालांतील ज्या ज्या लेखकांचा निर्देश केला आहे, त्यांतील इंग्रजी अमदानींतले व इंग्रजी भाषेशीं परिचय करून घेतलेले सर्व लेखक समजतात कीं इंग्रजी वाङ्मयांतील ग्रंथसंपत्ति आत्मसात् करून टाकली पाहिजे. हा मुद्दा अमान्य कोणासच नाहीं.

---

# प्रकरण ११ वें.

## इंग्रजीला बोधभाषेचा दर्जा कसा मिळाला ?

प्रथम तत्वप्रतिपादन आणि नंतर त्याच्या पुष्ट्यर्थ उदाहरण द्यावें लागतें. आतांपर्यंतच्या दहा प्रकरणांत मातृभाषा व तिची थोरवी वर्णन केली आहे. प्रसंगवशात् असेंही म्हणण्यांत आलें आहे कीं कोणत्याही राष्ट्रास आपल्या राष्ट्रभाषेचें महत्त्व वाटत असतें. इंग्लिश भाषेची स्थिति आपल्या मराठी-सारखीच होती, असेंही एकदां म्हणून तिची थोडीशी हकीकत देण्यांत

आली आहे. आणि कोणत्याही देशाला उन्नतीचें शिखर गांठवयाचें असल्यास त्यानें आपल्या मातृभाषेची उन्नति आधीं केली पाहिजे असेंही क्वचित् ध्वनित करण्यांत आलें आहे. या सर्व विधानांच्या पुष्ट्यर्थ कांहीं उदाहरणें दिलीं म्हणजे या पुस्तकाच्या हेतूच्या कक्षेंत येणाऱ्या विषयाचें निरूपण पुरें केलें असें आम्हांस वाटतें.

उदाहरणाकरितां दोन नमुने बस्स होतील. एक पाश्चिमात्य राष्ट्र आणि दुसरें पौर्वात्य राष्ट्र. जगांत प्रमुख पाश्चिमात्य राष्ट्रांच्या मांडीस मांडी ठोकून आपलें श्रेष्ठत्व सर्व जगास पटविणारें आज कोणतें पौर्वात्य राष्ट्र आहे बरें? प्रत्येक वाचकाला ताबडतोब तें नांव सुचेल. तें नांव म्हणजे जपान! अवघ्या चौदावर्षांच्या अवधींत जपाननें आपल्या भाषेच्या उन्नतीवर आपल्या देशाची उन्नति केली आहे. जपानच्या भाषाभिवृद्धीच्या प्रयत्नांचा इतिहास फारच चित्तवेधक आहे. पण यापुढील प्रकरणांत त्याचा नुसता ओझरताच उल्लेख करावा लागेल.

पाश्चिमात्य राष्ट्रांत आपण आपलें ग्रेट ब्रिटनच घेऊं म्हणजे झालें. आतांपर्यंतच्या विवेचनावरून ठरलेंच आहे कीं भाषेच्या पुनरुज्जीवनांत देखील आपणाला तेंच गुरुस्थानीं आहे.

ग्रेटब्रिटन आणि आयर्लंड असा या राष्ट्राचा उल्लेख करण्यांत येतो. पण आयर्लंड हें नांव निघालें कीं तो “ डी व्हॅलेरा ” आणि त्यांची ती स्वातंत्र्याची चळवळ यांचें स्मरण कोणालाही साहाजिकपणेंच होतें. शेवटीं त्या चळवळीचा शेवट १९२२ सालीं इंग्लंडशीं ज्या तहाअन्वयें झाला, त्या तहांत एक अट प्रामुख्यानें झळकत होती.

आयरिश भाषा ही आयर्लंडची राष्ट्रभाषा म्हणून मानण्यांत यावी. राज्यकारभाराच्या विशिष्ट कामाकरितां इंग्रजी उपयोगांत आणावयाची आहे.” ही ती मुख्य अट होय. ही अट उभयपक्षीं मान्य झाली, तेव्हांच तह ठरला. मातृभाषेचें महत्त्व पटविण्यास ही एकच गोष्ट पुरणार नाहीं काय?

ग्रेट ब्रिटनमधल्या वेल्स प्रांतांतील शिक्षणाच्या इतिहासाकडे नजर फेक-ल्यास असेंच आढळून येतें. १८९३ सालानंतर वेल्समध्यें शिक्षणाची व विश्वविद्यालयांची प्रगति झपाट्यानें झाली. पण त्या शिक्षणांत प्रांतिक उन्नतीची दृष्टि नव्हती. आपला धोपट धडा पूर्वापारचाच चालूं राहिला होता. वेल्समधील शिक्षणानें वेल्स प्रांताची अधिक उन्नति झाली पाहिजे ही कल्पना आतां वेल्स पुढाऱ्यांच्या डोक्यांत आली. शिक्षणाचा कस कमी होता असें मुळींच नाहीं. पण वेलसचे लोक आणि वेल्समधील उच्च शिक्षण या परस्परांचा फारच थोडा संबंध होता. शिक्षणाचें एक बोर्ड असावयाचें आणि त्या बोर्डानें परीक्षा घ्यावयाच्या आणि अभ्यासक्रम ठर-वावयाचे एवढेंच काय तें युनिव्हर्सिटीचें काम ! अशी स्थिति होती. शेवटीं पैसा अपुरा पडूं लागून जेव्हां नवीन जादा ग्रॅन्ट्सच्या मागणीची वेळ आली तेव्हां बरीचशी चळवळ होऊन १९१६ सालीं विश्वविद्यालयांत शिक्षण-सुधारणेकारितां रॉयल कमिशन नेमलें गेलें. लॉर्ड हाल्डेन् हे या कमिशनचे अध्यक्ष होते. १९२० सालीं रिपोर्ट बाहेर पडला. त्यावेळीं युनिव्हर्सिटीचीं निरनिराळ्या कॉलेजांवर असलेलीं जबरदस्त बंधनें ढिलीं करण्यांत आलीं. कॉलेजच्या परीक्षा आणि त्या परीक्षांचे अभ्यासक्रम याबद्दल कॉलेज अधि-काऱ्यांना बरेंच स्वातंत्र्य मिळालें. स्थानिक वैशिष्ट्याचा अभ्यासक्रमांत विचार करावयाचें ठरलें. असें होतांच मदतीला पैशाची लोकांनींही भर केली. वेलसचें वैशिष्टच वेलसच्या शिक्षणक्रमांत असलें पाहिजे, हें तत्त्व या सर्व चळवळीच्या मुळाशीं होतें. वेलसच्या लोकांना "the fervour of the Welsh zeal for education" पाहिजे होती. त्यांना वाटलें कीं—

26 "That system of education is most desirable for Wales, which, while preserving the *national type*, improves and elevates it, and at the same time gives opportunity for the development of any literary tastes or intellectual aptitudes which may be *characteristic of the nation.*"

---

२६ राष्ट्रीयत्वाचें रक्षण करून त्यांत सुधारणा घडवून आणणारी व त्याला उच्चता प्राप्त करून देणारी, त्याचप्रमाणें राष्ट्रीय गुणधर्मांनीं युक्त अशा वाङ्मयिक अभिरुचीचा व बौद्धिक पात्रतेचा विकास घडविण्यास संधि देणारी अशी शिक्षणपद्धति वेल्सला आवश्यक आहे.

पहा. राष्ट्रीयत्व, राष्ट्रीय बाणा, आपलेपणा, स्वत्व राखण्याची ही प्रवृत्ति पहा ! आपणा महाराष्ट्रीयांना युनिव्हर्सिटी शिक्षण सुधारण्याच्या आजच्या दिवसांत ही मार्गदर्शक होईल असें वाटतें.

१९०८ ते १९११ च्या अवधींत आयर्लंडांत अशीच चळवळ झाली व ती अशीच फलद्रूप झाली. शिक्षणाच्या सुधारणेचें हें युगच आहे असें वाटूं लागतें.

आपल्या महाराष्ट्रांत काय किंवा आपल्या हिंदुस्थानांत काय ज्ञानाचा प्रसार पुष्कळ झाला पाहिजे अशी सर्वांची मागणी आहे. मातृभाषा विरुद्ध परकी भाषा हा झगडा निदान प्राथमिक शिक्षणांत तरी खास नाहीं. मग या गोष्टीचा फायदा घेऊन आपण दुसऱ्या दिशेनें सपाटून प्रयत्न केला पाहिजे. तो असा कीं, इतर भाषांतलीं उत्तमोत्तम पुस्तकें मराठींत भाषांतरित करणें. आपल्या लोकांना गरीबीमुळें जर परकीभाषा शिकतां येत नसेल, तर परकी भाषेंतलें महाग व दुर्मिळ ज्ञान लोकांच्या भाषेंत आणून तें लोकांच्या हातीं देणें. हा प्रयत्न खरोखरच फार परिणामकारक ठरणारा आहे, आणि या उपायाला प्रत्येकानें लागलें पाहिजे.

आपल्या मार्गांत अनेक अडचणी आहेत, हें उघड उघड दिसतच आहे. ज्यांच्या मार्गांत त्या आमच्यासारख्या नव्हत्या त्यांनीं काय काय प्रयत्न केले हें वर सांगितलेंच आहे. पण ते जरी इंग्लिश लोकांशीं एका दृष्टीनें किंचित् भिन्न असले तरी एरवीं अगदीं जवळचे होते. त्यांच्यामध्यें प्रांतिक भिन्नताच होती. पण खुद्द इंग्लंडला जें कांहीं आपणाला पाहिजे तें कोणा परक्यापाशीं किंवा शेजाऱ्याकडे मागावयाचें नव्हतें ना ? तरी देखील त्यांना आपणाला काय पाहिजे तें आपणापाशींच मागावयाचें होतें. इंग्लिश लोकांना आत्मनिरीक्षण करावयाचें होतें. आपल्या मातृभाषेचा अधिक उत्कर्ष कसा होईल हा विचार इंग्लिश लोकांना करावयाचा होता. त्यासाठीं इंग्लंडच्या शिक्षणमंत्र्यांनीं एक कमिशन नेमलें. सर हेन्री न्यूबोल्ट हे त्या कमिशनचे चेअरमन असून सर आर्थर क्विलर-कौच, प्रोफेसर फर्थसारखे

विख्यात विद्वान् त्या कमिशनचे सभासद होते. त्यांच्या रिपोर्टाचें मंथन केल्यास पुढील सारतत्त्व बाहेर पडतें.

27 " Education in English is, for all English men, a matter of the most vital concern, and one which must, by its very nature, take precedence of all other branches of learning. It is self evident that until a child has acquired a certain command of the native language, no other educational development is even possible. If progress is not made at one time in the region of arithmetic or history or geography, the child merely remains backward in that respect, and the deficiency can be made later. But a lack of language is a lack of the means of communication and of thought itself.... ... ... ... ... ... ... English is plainly no matter of inferior importance, nor even one among the other branches of education, but the one indispensable preliminary and fountain of all the rest ... ... ... ... English may come by nature up to a certain point : but that point is soon reached and thence forward the possibi-

२७ इंग्लिश लोकांना इंग्लिश शिक्षण घेण्याची बाब फार जिव्हाळ्याची वाटते. दुसऱ्या कोणत्याही शिक्षणांगापेक्षां भाषाशिक्षण अगोदर होणें स्वभावतःच आवश्यक आहे. मुलाला आपल्या मातृभाषेचें कांहीं ठराविक इयत्तेइतकें ज्ञान झाल्याशिवाय त्याची इतर विषयांत प्रगति होणें शक्य नाहीं. गणित, इतिहास अथवा भूगोल या विषयांत एक वेळ मति न चालल्यास तेवढ्याच विषयांत मागें पडावें लागेल पण नंतर त्याची भरपाई करतां येईल. परंतु भाषेंतील अज्ञानाच्या योगानें व्यवहाराचें व विचारव्यक्तीकरणाचें साधनच गमावल्यासारखें होईल....................इंग्लिश भाषा ह्मणजे कमी महत्त्वाची बाब नव्हे, शिक्षणाच्या इतर उपांगांपैकींच तें एक आहे असेंही मानतां येणार नाहीं, तर शिक्षणाच्या इतर सर्व उपांगांचें ती एक मूळ कारण व अत्यंत अवश्य अशी पूर्व तयारीच होय......इंग्लिश भाषेच्या अभ्यासाची कांहीं ठराविक मर्यादा कोणी घालतील, पण ज्यांना मातृभाषेचें थोडेंही प्राविण्य मिळवितां

lity of mental development in whatever direction, is seriously diminished for those who have not achieved some mastery of their mother-tongue. What a man cannot clearly state he does not perfectly know, and, conversely, the inability to put his thought into words sets a boundary to his thought ... ... ... We re-iterate, then, the two points which we desire to build upon ; first, the fundamental necessity of English for the full development of the mind and character of English children, and, second, the fundamental truth that the use of English does not come to all by nature, but is a fine art and must be taught as a fine art."

हा उतारा वाचल्यावर वाचकांना मातृभाषेच्या महत्त्वाची सत्यता पक्की पटेल. वरील उताऱ्यांत ज्या ठिकाणीं " इंग्लिश भाषा " असे शब्द असतील, त्या ठिकाणीं " मराठी भाषा " असे शब्द घातले म्हणजे हा उतारा बहुतांशीं आपल्या बाबतींत पूर्णपणें लागू पडेल.

इंग्रजी भाषेची आजची समृद्धावस्था पाहून व तिच्याशीं मराठीची तुलना करून हताश होणाऱ्यासाठीं, इंग्रजी भाषेची थोडीशी पूर्वींची हकीकत देणें जरूर आहे.

---

आलें नाहीं त्यांनीं ती मर्यादा फारच लवकर गांठल्यासारखें होईल व त्यांच्या मनोविकासाचा संभव तत्क्षणींच कोणत्याही बाजूनें कां होईना खुंटल्यासारखाच होईल. जी गोष्ट एखाद्याला स्पष्ट शब्दांनीं सांगतां येत नाहीं, ती त्यालाच नीट समजत नसते आणि याच्या उलट विचारांना शब्दांनीं व्यक्त करतां न येणें म्हणजे विचारांचीच गति कुंठित करणें होय......वरील दोन मुद्दे पुन्हा स्पष्ट केले पाहिजेत कारण त्यांच्यावरच पुढील विचारांची मदार आहे. पहिला --इंग्लिश मुलांना मन व स्वभाव यांच्या पूर्ण विकासनासाठीं इंग्लिश भाषेची अत्यावश्यकता, व दुसरा--इंग्लिश भाषेचा उपयोग करणें सर्वांनाच सरास स्वाभाविकपणाचें होणार नाहीं, तर ती एक कला आहे आणि कला म्हणूनच तिचा अभ्यास केला पाहिजे.

मागच्या एका प्रकरणांत इंग्रजीला बोधभाषेचें स्थान बरींच वर्षें मिळालें नव्हतें याचा उल्लेख संक्षिप्तपणें करण्यांत आलेलाच आहे. त्यांत येथें थोडीशीच भर टाकावी लागेल.

आज हिंदुस्तानांत इंग्रजी भाषेचें जें महत्त्व आहे, तेंच महत्त्व लॅटिन् भाषेला इंग्लंडांत सरासरी चौदावें शतक अर्धें उलटून जाईपर्यंत होतें. त्यावेळीं अशी समजूत होती कीं इंग्लिश भाषेमधून ज्ञानबोध होण्याचा, कधींकाळीं संभवच नाहीं. त्यावेळीं लॅटिन् ही बोधभाषा असली तरी फ्रेंच ही समाजव्यवहारांत आणि राज्यकारभारांत प्रतिष्ठितपणा मिळवून बसली होती. कांहीं काळानें म्हणजे सरासरी १३६२ सालापासून न्यायाधीश कोर्टांत आणि पार्लमेंटसभेंत इंग्रजीचा प्रथम प्रवेश झाला. तरी परदेशव्यवहाराची प्रौढ भाषा लॅटिन् हीच राहिली. कारण इंग्लिश भाषेला संपन्न करण्याचें कोणाच्याच मनांत येत नव्हतें. एवंच लॅटिन्ला प्रमाणाबाहेर महत्त्व मिळाल्यामुळें इंग्रजीचा पायासूद अभ्यास करावासा कुणालाही वाटत नसे. त्यावेळीं इंग्लंडांत असे कांहीं उत्तम शिक्षक असत कीं त्यांना लॅटिन् लिहितां वाचतां चांगलें येई, पण इंग्रजीचा गंधही नसे! त्यावेळीं इंग्रजीला किती हीन लेखीत असत, हें पुढील चुटक्यावरून कळण्यासारखें आहे.

रॉजर आश्शम हे इलिझाबेथ राणीचे ट्यूटर होते. त्यांनीं "टॉक्सोफिलस्" नांवाचें एक पुस्तक इंग्रजी भाषेंत लिहिण्याचें धाडस केलें. तें पुस्तक धनुर्विद्येवर लिहिलें असून १५४५ सालीं प्रसिद्ध झालें होतें. त्यांनीं तें पुस्तक इंग्रजींत लिहिलें. पण त्याच्या प्रस्तावनेंतच त्यांनीं इंग्रजींत तें पुस्तक लिहिल्याबद्दल पश्चात्ताप व्यक्त करून ठेवला होता! "इंग्रजीशिवाय दुसऱ्या कोणत्याही भाषेंत हें पुस्तक मीं लिहिलें असतें तर फायद्याच्या व कीर्तीच्या दृष्टीनें माझें अधिक कल्याण झालें असतें. कारण असला विषय व त्याचें चांगलें विवेचन करण्यास इंग्रजीसारखी निरुपयोगी दुसरी कोणतीच भाषा नाहीं!......" असे उद्गार ग्रंथकर्त्याला त्यावेळीं पुस्तकाच्या आरंभींच काढावे लागले होते!

परंतु या नंतर लॅटिनच्याविरुद्ध प्रतिक्रियेस सुरवात झाली. १५८२ सालीं मल्कॅस्टर नामक गृहस्थानें “ इंग्रजी लेखन ” या विषयावरच एक ग्रंथ प्रसिद्ध केला. त्यापासून लॅटिन्नेंच सगळ्या ज्ञानाचा मक्ता कोणापासून मिळविला आहे ? आणि तो कायमचा कां म्हणून टिकावा ? अशा प्रकारचे विचार लोकांच्या डोक्यांत घोळूं लागले आणि इंग्रज लोकांना आपल्या मातृभाषेविषयीं आपलेपणा वाटूं लागला.

पण खरी क्रांति झाली ती सतराव्या शतकाच्या अखेरीस. यावेळीं प्युरिटन् लोकांच्या धार्मिक मतांनीं सर्व राष्ट्रांस भारून टाकलें होतें. ह्याच संधीस आपल्या राष्ट्राच्या बौद्धिक व्यवहारांतसुद्धां लॅटिन् भाषेस भलतीच धुडगूस घालूं द्यावयाचा नाहीं असें इंग्रजांस वाटूं लागलें. बायबलचें भाषांतर इंग्रजींत झालें. त्यामुळें सर्वांची दृष्टि पालटली. लिहिणें, बोलणें आणि विचार करणें सर्व इंग्रजींतूनच झालें पाहिजे असें सर्वांस वाटूं लागलें. होतां होतां अठराव्या शतकापासून लॅटिन भाषेला इंग्लंडांतून एक एक पाऊल मागें हटत जावें लागलें, आणि तिची जागा इंग्रजीनें बळकावली.

मल्कॅस्टरनें १५८२ सालीं जें पुस्तक लिहिलें त्यांत त्यानें धर्मापेक्षां सुद्धां मातृभाषेला अधिक महत्त्व दिलेलें आहे. आपल्या त्या पुस्तकांत त्यानें चक्क लिहून टाकलें कीं—

28 “ ... I love Rome but London better; I favour Italy, but England more; I honour the Latin, but I worship the English ”

मातृभाषेच्या प्रेमाचा केवढा जबरदस्त उमाळा आहे तो पहा. हा उमाळा आज प्रत्येक महाराष्ट्रीयाला आला पाहिजे. प्रत्येक महाराष्ट्रीयानें म्हटलें पाहिजे कीं——

“ I favour English, I honour Sanskrit, but I worship Marathi.”

---

२८ रोम मला आवडतें, पण लंडन अधिक आवडतें. इतालीची मला आवड आहे, पण इंग्लंडची त्याहून जास्त आहे. लॅटिनचा मला पूर्ण आदर आहे, पण इंग्लिश तर मला पूज्यच आहे !

" इंग्रजी आह्मांला पाहिजे, अगदीं अवश्य आहे. संस्कृत आह्मांला पूज्य आहे, पण मराठी आमचा श्वास, आमचा प्राण आहे. " ही भावना प्रत्येक महाराष्ट्रीयाला आज झाली पाहिजे. मुलानें बापाला आणि प्रियेनें प्रियतमाला इंग्रजींत पत्रें पाठवितांना मनाला शरम वाटली पाहिजे. आपल्या मनाच्या नाजूक—प्रेमळ भावना व्यक्त करावयास परकी भाषा जवळ धरण्याइतकें मातृभाषेस परकी लेखण्याचें जें पातक आपण करतों त्याचें परिमार्जन करण्याची वेळ आतां येऊन ठेपली आहे.

मॅल्कॅस्टरच्या पुस्तकानंतर मधला इतिहास सोडून १६९० सालीं लॉकेनें लिहिलेल्या

" Some thoughts concerning Education "

या पुस्तकाचा उल्लेख करावासा वाटतो. यांत ग्रंथकर्त्यानें मातृभाषेचें वकीलपत्र घेऊन तिचें महत्त्व पटवतांना भाषापटुत्वाची व अंतःकरणाच्या कळकळीची कमाल केली आहे. तो म्हणतो—

29 " Since it is English, that an English gentleman will have constant use of, that is the language he should chiefly cultivate, and wherein most care should be taken to polish and perfect his style ... ... ... ... ... ...

This I find universally neglected, and no care taken anywhere to improve young men in their own language, that they may thoroughly understand and be masters of it. If any one among us have a facility or purity more than ordinary in his Mother Tongue, it is owing to chance, or his genius, or anything, rather than to his education or any care of his teacher."

---

२९ इंग्रजाला ज्याअर्थीं इंग्रजी भाषेचाच वारंवार उपयोग करावा लागणार आहे, त्याअर्थीं त्यानें त्या भाषेची सरणीच आत्मसात करण्यासाठीं काळजी घेतली पाहिजे व तिच्यांत निर्व्यंगता व पूर्णत्व मिळविलें पाहिजे.

पण या बाबतींत मला सर्वत्र अनास्थाच दिसते. मुलांना मातृभाषेचें ज्ञान मिळून त्यांत त्यांची उत्तम प्रगति व्हावी याविषयीं काळजी घेण्यांत येत नाहीं.

आपल्या आजच्या स्थितीला हे विचार किती तंतोतंत लागू पडतात पहा. शास्त्रीबोवा, आगरकर, लोकमान्य अथवा हरिभाऊ हे जे निर्माण झाले ते घरच्या शिक्षणामुळें व इतर परिस्थितीमुळें खंदे लखक झाले; प्रचलित शिक्षणपद्धतीनें झाले असेंच म्हणतां येणार नाहीं. आजच्या कालांतही जे कांहीं लोकोत्तर मराठी ग्रंथकार आहेत ते खाजगी परिश्रमानें उदयास आलेले आहेत. मराठीच्या अभ्यासाचें शिक्षण त्यांना प्रचलित शिक्षणपद्धतींत पायासूद मिळालें म्हणून ते कीर्तिमान झाले असें म्हणतां येणार नाहीं. उलटपक्षीं प्रचलित शिक्षणपद्धति मातृभाषेस अनुकूल असती तर असे ग्रंथकार अधिक प्रमाणांत निर्माण झाले असते. मातृभाषेंतून सर्व शिक्षणप्रणालिका आंखली जाईल तेव्हां महाराष्ट्राच्या भाग्योदयास आरंभ झाला असें म्हणावयास इतर राष्ट्रांच्या इतिहासाचा आधार आहे.

इंग्लंडांत एकुणिसावें शतक सुरू झालें त्याबरोबर नवजागृति झालेली होती. उद्योगधंदे कारखाने चोहींकडे उठूं लागले होते. गरीब वर्गाची शिक्षणलालसा वाढली होती; व सरकारची शिक्षणप्रसार करण्याची इच्छा तीव्र होती. मजूर वर्गाला शिक्षण सुलभ करून दिलें पाहिजे होतें. अर्थात् इंग्रजीला सार्वत्रिक बोधभाषा करून टाकण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. इंग्रजीला संपन्न करण्याचा प्रयत्न या काळींच फार झाला. तेव्हां राष्ट्रभाषेकरितां राष्ट्रानें कळकळीचे कसून प्रयत्न करणें हें राष्ट्रोन्नतीचें एक अवश्यमेव कारण ठरतें.

इंग्रजीचें वैभव आज चारी खंडांत गाजतें आहे. कबूल. तरी सुद्धां आज जर्मन भाषेंत रसायन शास्त्राचें जसें ग्रंथभांडार आहे, तसें इंग्रजींत नाहीं, असें तज्ज्ञाचें मत आहे. उद्यां जर एखाद्या जर्मन प्रोफेसरानें लंडनांत

---

आपल्यांपैकीं एकाद्याचें मातृभाषेत इतराच्याहून कांहीं जास्त प्रावीण्य जर दिसत असेल तर तें शिक्षणानें, अथवा शिक्षकाच्या कळकळीनें प्राप्त झालेलें नसून यदृच्छेनें, उपजत बुद्धीमुळें अथवा इतर कशानें तरी दिसत असलें पाहिजे.

जाऊन जाहीर केलें कीं " आमच्या वाङ्मयांत रसायन शास्त्रावरील योग्य व भरपूर ग्रंथसंपत्ति असल्यामुळें व इंग्रजींत ती तितकी विपुल नसल्यामुळें इंग्लंडांतल्या सर्व विद्यालयांतून रसायनशास्त्रावरचीं व्याख्यानें जर्मन भाषेंतच दिलीं पाहिजेत, तरच विषयाचा खरा बोध विद्यार्थ्यांस होईल ! " तर या पंडिताच्या मताचा बोजवारा कसा काय उडेल तें सांगावयास पाहिजे असें नाहीं. तपिळ स्वभावाचे श्रोते असतील ते त्या शार्मण्य पंडिताची संभावना व्यासपीठावरच करतील, पण जे विशेष शांतस्वभावी व विचारशील असतील, ते देखील म्हणतील " आम्ही, जर्मनींतली ग्रंथ-संपत्ति इंग्रजींत भाषांतरित करून घेऊं तरी एक, अथवा ज्यानां रसायन-शास्त्राचें विशेष जाडें ज्ञान हस्तगत करावयाचें असेल त्या इंग्रजांनीं खुशाल जर्मन भाषेंत प्रावीण्य मिळवून जर्मन भाषेंतलें रसायन-शास्त्र-विषयक वाङ्मय वाचावें. पण जर्मन भाषेंतून सर्रास व्याख्यानें इंग्लंडच्या विद्यालयांतून सुरू करतां येणार नाहींत, याबद्दल प्रोफेसर साहेब, आम्ही दिलगीर आहों !" आणि इंग्लंडचे लोक असें म्हणाले तर तें अयोग्य आहे काय ? ती त्यांची चूक आहे असें कोण म्हणेल ? एखाद्या भाषेंत एखाद्या विशिष्ट ज्ञान-शाखेचें वाङ्मय भरपूर नसलें म्हणून ती भाषा बोधभाषा व्हावयास अयोग्य ठरते असें कसें म्हणतां येईल ? त्या शाखेची वाढ होणार नाहीं असें नाहीं. किंवा परक्या भाषेंत विशेष प्रावीण्य मिळवूं इच्छिणारास कोणतीही आड-काठी असणार नाहीं. पण बोधभाषा मातृभाषाच असली पाहिजे हेंच तत्त्व जगांत मान्य झालेलें आहे. आणि म्हणून महाराष्ट्राची उच्च शिक्षणाची देखील बोधभाषा सर्रास मराठीच झाली पाहिजे.

---

# प्रकरण १२ वें.

## जपानी भाषेचा दाखला.

मातृभाषेच्या उन्नतीवर राष्ट्राची उन्नति बऱ्याच अंशीं अवलंबून असते हें वारंवार दर्शविण्यांत आलेंच आहे. पण मातृभाषेच्या उन्नतीच्या मार्गांत जपानला जितक्या अडचणी आल्या तितक्या दुसऱ्या कोणत्याही राष्ट्राला आल्या नसतील. जपानच्या स्वातंत्र्याचा इतिहास फार मौजेचा आहे.

ख्रिस्ती मिशनऱ्यांचा पाय लागला नाहीं असा भूप्रदेश पृथ्वीच्या पाठीवर असेलच असें खात्रीनें म्हणतां यावयाचें नाहीं. या जगदोद्धारकांचें पाऊल जपानकडे सतराव्या शतकांत वळलें होतें. पण जपाननें आपल्या राष्ट्रांत परदेशीयांस लागलीच बंदी केली ! त्यामुळें त्या ठिकाणीं जपान स्वकल्याणास आंचवला असें त्या परोपकारी धर्मोपदेशकांस वाटल्याशिवाय राहिलें नसेल ! १६३७ नंतर जपानांत पाऊल ठेवण्यास चिनी व डच लोकांसच काय ती मोकळीक होती, बाकीच्यांस मज्जाव झाला. डच लोकांस जपानांत राहूं दिलें खरें, पण त्यांना एका बाजूस दूरच्या बेटावर ठेवण्यांत आलें होतें. त्यांना राज्यांत येऊन वस्ती करण्यास मोकळीक नव्हती. तथापि जपानी लोकांचें या डच लोकांशीं दळणवळण वाढून त्यांनीं डच भाषेचें ज्ञान मिळविलें. तें फक्त बोलण्यापुरतें होतें. पण त्यांना त्या भाषेची गोडी लागली आणि डच भाषा शिकण्यास आपणास परवानगी मिळविण्याकरितां जपानी लोकांनीं सरकारकडे विनंति केली. त्यावेळीं सरकारनेंही ती दिली. डच भाषा त्यांना संपन्न दिसली. यापूर्वी त्यांना दुसरी कोणतीही युरोपियन भाषा ठाऊक नव्हती. पण डच भाषा येऊं लागल्याबरोबर जपानी लोकांनीं काय केलें असावें बरें ? त्यांनीं डच भाषेच्या कोशांच्या प्रती लिहून काढल्या, आणि लगेच त्यांचीं भाषांतरें

केलीं. डच भाषेंतील वैद्यकीय ग्रंथांनीं जपानी लोकांचें लक्ष प्रथम वेधून घेतलें. त्यांत शस्त्रक्रियेवर उत्तम ग्रंथ होते. जपानी लोकांस फक्त चिनी भाषेंतील वैद्यक ग्रंथ माहीत होते. परंतु डच भाषेंतले ग्रंथ विशेष विश्वसनीय व अचूक असल्याचें पटतांच त्यांनीं ते सर्व ग्रंथ भराभर आपल्या भाषेंत उतरण्यास सुरवात केली. १७७१ सालापर्यंत जपानची चिनी ग्रंथांतील ज्ञानावर भिस्त होती, पण तद्नंतर वर सांगितल्याप्रमाणें ती हळूहळू उडत चालली.

जपानी भाषेच्या इतिहासांत १७७१ सालाच्या मार्च महिन्याची ४ तारीख ही चिरस्मरणीय व महत्त्वाची मानण्यांत येते. “ अभिनव जपानचा जन्म ” या दिवशीं झाला, असें सर्व राष्ट्राभिमानी जपानी समजत असतात. त्या दिवशीं कोणी एका “ सुगिता ” नामक जपानी गृहस्थानें शस्त्रक्रियेवरील डच ग्रंथाचें जपानींत भाषांतर करावयास घेतलें होतें. त्या पहिल्या भाषांतराच्या अडचणींची व मानवी प्रयासांच्या पराकाष्ठेची हकीकत जपानी प्रोफेसर युकिटा यांनीं लिहून ठेवलेली आहे. पण ती देण्याचा मोह आवरणें भाग आहे.

त्यानंतर १७८८ सालीं “ ओत्सुकी ” नामक दुसऱ्या एका जपान्यानें “ डच भाषेचें पहिलें पुस्तक ” दोन भागांत प्रसिद्ध केलें व त्यावरून जपानी लोक भराभर डच शिकूं लागले. जपानी भाषेला त्यावेळीं भाषा म्हणणें चुकीचेंच ठरेल. ‘ सुगिता ’ ला शस्त्रक्रियेचा ग्रंथ स्वभाषेंत आणण्यास जे श्रम पडेल ते भाषांतराचेच जास्त पडले. कारण भाषांतराला आवश्यक असे शब्द व व्यापकता जपानी भाषेची त्यावेळपर्यंत नव्हती. त्यानंतर १८०८ सालीं इंग्लेशांचें व तद्नंतर रशियन वगैरे लोकांचीं जहाजें जपानच्या किनाऱ्याभोंवतीं फिरूं लागलीं. त्यांना पाहून जपानला आपल्या घराभोंवतीं घिरट्या घालणाऱ्या आगंतुक पाहुण्यांची चौकशी करणें भाग पडलें ! जपान सरकारनें ‘ ओत्सुकी ’ ला डच भाषेमधून युरोपीय राष्ट्रांची मिळेल तेवढी माहिती संकलित करण्याचा हुकूम फर्माविला. ओत्सुकीनें

लगेंच ' होकुहेन टांजी ' (उत्तरेकडच्या गोष्टी ) व "बाशीन हिको"( खाजगी विचार ) या नांवाचे दोन ग्रंथ लिहून शक्य ती माहिती एकत्र ग्रथित केली.

१८११ सालीं जपान सरकार या दिशेनें आणखी थोडें पुढें गेलें आणि ट्रान्सलेशन ब्यूरो सरकारतर्फेंच उघडण्यांत येऊन त्याच्यावर मुख्य ओत्सुकीला नेमण्यांत आलें. डच भाषेच्या पद्धतशीर भाषांतरास येथून सुरवात झाली. सरकारी प्रयत्न असे चालू असतां खाजगी प्रयत्नही सुरू होते. गेन्शिन उदागवा हा ओसुत्कीचा शिष्य डच भाषेंत प्रवीण होऊन त्यानें शारीरशास्त्रावर एक भला थोरला ग्रंथ तीस खंडांत लिहून प्रसिद्ध केला. झालें. पाश्चिमात्य ज्ञानाची जपानास चटक लागून एकेकानें एकेक काम पत्करून पाश्चात्य वाङ्मयोदधींत अवगाहन करण्यास जपानी लोक प्रवृत्त झाले.१८२६ त 'आओची'नें पदार्थविज्ञानशास्त्रावर पुस्तक लिहिलें. १८३९त रसायन शास्त्रा-वर पुस्तक लिहिलें गेलें,व १८४७त'साबुरो फुजाय्'नें जपानी राष्ट्रास **इंग्रजी भाषेचा परिचय** करून दिला.तर१८२०त'मुराकामी'नें स्वतःच फ्रेंच भाषेंत पारंगतता संपादून त्यानें ती भाषा स्वदेशीयांस शिकविण्याचे वर्ग सुरू केले !

यानंतर अर्धवट व रांगडच्या आणि बालिश जपानी भाषेंत परदेशीय गहन ग्रंथांचें भाषांतर ग्रहण करण्याची पात्रता येण्याइतकी प्रौढता, लवचीकपणा व संपन्नता आणण्यासाठीं जे भगीरथ परिश्रम केले आहेत, ते वर्णन करणें स्वतंत्र ग्रंथाचेंच काम आहे. सरकार आणि लोक यांचें संघटित कार्य झालें म्हणूनच ते इतक्या लौकर यशस्वी ठरले. जपानी लोकांचा दुसरा एक सद्गुणविशेष या बाबतींत ध्यानांत घेण्यासारखा आहे. जें ज्ञान आपणास मिळालें तें आपल्या देशबांधवांस देण्यास त्यांनीं अश्रांत श्रम केले. लोकांपेक्षां आपणास कांहींतरी जास्त येतें या समजुतीनें मगरूर बनून ते साध्या व गरीब लोकांपासून फटकून वागून त्यांचा तिरस्कार करूं लागले नव्हते. आपल्या देशबांधवांस ज्ञानसंपन्न करण्याची त्यांची कळकळ वाखाणण्याजोगी आहे. म्हणूनच त्यांच्या भाषेला एवढी श्रीमंती इतक्या लौकर आली. " † युकिचि फुकुझावा " सारखे वीर निर्माण होऊन त्यांनीं

---

† याचें चरित्र प्रस्तुत लेखकानें १९२७च्या रणगर्जनेच्या एका अंकांत लिहिलें आहे तें जिज्ञासूंनीं अवश्य पहावें.

आपलें राष्ट्र सुशिक्षित करण्यासाठीं जीव पाखडला. " फुकुझावा " नें १८६६ सालीं एका पुस्तकांत " पाश्चिमात्य सुधारणांचें ज्ञान " आपल्या लोकांस करून दिलें. त्यानें एकट्यानें सन १८९० त स्थापन केलेली एक खाजगी प्राथमिक शाळा केवढी तरी मोठी सध्याची " कीथिओगिजुकु युनिव्हर्सिटी " बनली. त्यानंतर त्यानें " अध्ययनाचें आमिष " नांवाचा ग्रंथ लिहिला; त्याच्या ३४००००० प्रती झटक्यासरशी उडाल्या; १८८२ सालीं त्यानें " जिजि " ( काळ ) नामक वर्तमानपत्रही जपानी भाषेंत सुरू केलें !

याच्या पुढचा थोडासा भाग खरा महत्त्वाचा आहे. जी गोष्ट इंग्रजीच्या इतिहासांत पूर्वीं झाली, जी आज मराठीच्या इतिहासांत आपण पहातों आहोंत, जी गोष्ट कोणत्याही भाषेच्या इतिहासांत केव्हां तरी घडलीच पाहिजे, तीच ती गोष्ट होय. जपानी भाषेंत भरपूर अर्थवाहकता नसल्यामुळें ती व्याख्यानांस अपात्र आहे असा समज सार्वत्रिक झाला होता. याला कारण परकीय भाषांचा परिचय. परकी भाषांच्या लखलखाटानें जपानी नवशिक्षित गांगरून गेलेले होते. त्यानें जपानी भाषेंत व्याख्यानें स्वतःच द्यावयास सुरुवात केली. आक्षेपकांचे आक्षेप अवास्तव नव्हते. पण त्यांना उपाय योजण्यास कोणी तयार नव्हता म्हणून ते आक्षेप राहिले होते. नवीन शब्दांची भरती करण्याचा अखंड प्रयत्न फुकुझावानें आरंभिला. आधुनिक कला व शास्त्रीयज्ञान जपानी भाषेंतून प्रकट करतां येतें याची खात्री त्यानें जपानी राष्ट्रास एकट्यानें पटवून दिली. आक्षेपकांचीं तोंडें बंद झालीं. त्यानें एकंदर ५० ग्रंथ लिहून आपलें नांव राष्ट्रीय वाङ्मयांत अजरामर करून ठेवलें. तो १९०१ सालीं परलोकवासी झाला. तेव्हां त्याच्या प्रेतयात्रेस वीस हजार लोकांचा प्रचंड जनसमुदाय लोटला होता.

जपानी भाषा मूळची अगदींच दरिद्री. चिनी भाषेंतला शब्द घ्यावयाचा, त्याला जपानी भाषेंतले निरनिराळे प्रत्यय लावावयाचे आणि स्वतंत्र शब्द निर्माण करावयाचे, असला खटाटोप जपानी लोकांस भाषाभिवृद्धीकरितां करावा लागला आहे. याचें कारण जपानी भाषेचा उगम

कोठून झाला आहे हेंच अद्याप जेथें भाषाशास्त्रभिज्ञांस नीटसें उमगत नाहीं, तेथें भाषेची नीट वाढ कोणत्या तत्त्वावर व कशी करावयाची ? इसवी सनाच्या सातव्या शतकापर्यंत जपानी लोकांस लिपीच नव्हती. आतां चिनी व जपानी लिपींत पुष्कळसें सादृश्य दिसतें खरें, पण चिनी एकावयवी शब्दांची तर जपानी अनेकावयवी शब्दांची बनलेली आहे. शिवाय दोन्ही भाषांच्या मोडणींतही फरक फार आहे.

चिनी भाषेची संस्कृति फार प्राचीन आहे. पण जपानांत तिचा प्रथम प्रवेश झाला तो कोरियाच्या मार्गानें झाला. आणि नंतर कांहीं शतकांनीं प्रत्यक्ष चीनकडून सरळ झाला. त्यामुळें पूर्वीच्या व नंतरच्या मोडणींत फरक पडला. म्हणजे हा जपानी भाषेंत अधिकच घोंटाळा झाला. तेव्हां लॅटिनवरून इंग्रजी, संस्कृतवरून मराठी, तशीच चिनीवरून जरी जपानी भाषा उद्भवली तरी आतां तिच्यांत जमीनअस्मानाची तफावत पडली आहे. आतां जपानी भाषेंत जगांतल्या अप्रगल्भावस्थेंतल्या प्राथमिक भाषांचें विलक्षण संमिश्रण झालेलें आहे. इजिप्तच्या मनोऱ्यांवरील चित्रलिपींप्रमाणें असणाऱ्या चिनी चित्रलिपीचें, अक्षरलिपीचें, उच्चाराशीं अक्षरांचें साम्य नसलेल्या ध्वनींच्या खुणांचें असलें अठरा धान्यांचें कडबोळें त्यांना बनवावें लागलें. त्यामुळें परदेशीयांस जपानी भाषा शिकणें अशक्यप्राय झालें आहे. पण इतक्याही प्रतिकूल परिस्थितींत जपानी राष्ट्रपुढाऱ्यांनीं आपल्या भाषेचें वैभव वाढविलें आहे. चिनी शब्दांवर जपानी प्रत्यय लावून जपानी शब्द बनवून टाकले. 'देन' हा चिनी शब्द. त्याचा अर्थ 'वीज' जपानी प्रत्यय "कि" याचा अर्थ उच्छ्वास असा आहे. 'देंकि' हा शब्द जपानी भाषेंत वरील शब्द खंडावरून बनला. त्याचा अर्थ विद्युत् अथवा इलेक्ट्रिसिटी असा आहे. "वा" या जपानी प्रत्ययाचा अर्थ 'संभाषण' 'देन्वा' या बनावट जपानी शब्दांचा अर्थ "टेलिफोन" या अर्थाचा झाला. 'टो' म्हणजे प्रकाश, तर देन्टो म्हणजे "विद्युद्दीप" असे भराभर शास्त्रीय शब्द बनवून परिभाषा तयार करण्यांत आली.

बरें जपानी भाषेंत बोलावयाच्या शब्दांचा लिहावयाच्या अक्षराशीं मेळ नाहीं ! कारकें नीट नाहींत. व्याकरणाची नियमबद्धता नाहीं. एक ना हजार अडचणी ! आणि इतक्याही अडचणी असतां जपानी भाषेंत वाङ्मयाची भरताड भलतीच होत चालली ! तेव्हां जपानी लोकांच्या प्रयत्नांची कमाल नाहीं असें कोण म्हणेल ?

आतां याच्या उलट आपली स्थिति पहा. आपली जी संस्कृत व म्हणजेच मराठी लिपी तिला देवनागरी असें म्हणतात, व तिच्या इतकी परिपूर्ण लिपि जगांत दुसरी नाहीं. इंग्लिश व तत्सम युरोपीय भाषांची रोमन लिपि देखील उच्चारांच्या बाबतींत सदोष आहे हें येथें सिद्ध करून द्यावयाची जरूर नाहीं. इतकी ही गोष्ट उघड आहे. पण आपली देवनागरी अगदीं स्वयंपूर्ण अशी आहे. १९०५ सालीं दिलेल्या आपल्या एका व्याख्यानांत लोकमान्य टिळक म्हणतात कीं:—

" European Sanskritists have declared that the Devanagari alphabet is more perfect than any which obtains in Europe."

म्हणजे युरोपियन संस्कृतभाषापंडित कबूल करतात कीं युरोपांतल्या कोणत्याही लिपीपेक्षां देवनागरी लिपि अधिक पूर्ण अशी आहे. हा युरोपियन लोकांचाच कबुलीजबाब आहे. लोकमान्य पुढें म्हणतात:—

30. "No, I would go further and say that the classification of letters and sounds on which we have bestowed so much labour in India and which we find perfected in the works of Panini is not to be found in any other language in the world...We have one sound for one letter and one letter for each sound. ..."

---

३० कां ? मी आणखी पुढें जाऊन असेंही म्हणेन कीं हिंदुस्थानात आपण ज्यावर इतके परिश्रम केले आणि पाणिनीच्या ग्रंथांत जें पूर्ण परिणतावस्थेस पोंचलें तें शब्दांचें व ध्वनींचें वर्गीकरण जगांतील दुसऱ्या कोणत्याही भाषेंत आढळून येणार नाहीं. आमच्यामध्यें प्रत्येक वर्णाला स्वतंत्र उच्चार आहे आणि एकेका उच्चाराला एकेक वर्ण आहे.

इतकी सोई दुसऱ्या कोणत्याही भाषेंत नाहीं. असें असतांना आपणाला आपली भाषा संपन्न नाहीं म्हणून कपाळावर हात घेऊन बसण्याची पाळी यावी काय ? लोकांनीं आपल्यापेक्षां किती प्रतिकूल परिस्थितींतून आपला मार्ग मोकळा केला आहे, हें पाहिलें असतां आपल्याला हुरूपच आला पाहिजे. आपल्याला फक्त संघशक्तीनें प्रयत्न करणें व आळस झाडणें या दोनच गोष्टी करावयाच्या मुख्यत्वें आहेत. या बाबी पार पाडतांना आपणाला प्रथम येणारी अडचण म्हणजे द्रव्याची होय, हें सहज दिसणारें आहे. कारण वाङ्मयाचें प्रेम परदेशांतल्या लोकांसारखें आपल्या लोकांना नाहीं. म्हणूनच उदार धनिकांनीं आपल्या दातृत्वशक्तीचा ओघ या दिशेनें वाहविला पाहिजे. एका काळीं, ब्राम्हणभोजनें, व रुद्रावर्तनें एवढ्याच गोष्टी दानविषय झाल्या होत्या. बदललेल्या परिस्थितिनुसार रुद्रावर्तनांच्या ऐवजीं कॉंग्रेस संस्था, शिक्षण संस्था, रुग्णालयें इत्यादि संस्था दानविषय होत आहेत. त्याचप्रमाणें वाङ्मयवर्धन—संस्था देखील धनिकांना दानविषय वाटूं लागल्या पाहिजेत व महाराष्ट्रीय वृत्तपत्रांनीं त्याप्रकारची लोकजागृति लेखनद्वारा समाजास करून दिली पाहिजे. असें होईल तर मराठी वाङ्मयास देखील लवकरच उर्जितावस्था प्राप्त होईल, असें भविष्य वर्तविण्यास आजच्या स्थितीवरून हरकत वाटत नाहीं.

---

# प्रकरण १३ वें.

## एतद्देशीय कांहीं भाषांचे दाखले.



मातृभाषेच्या अभ्युदयासाठीं मागें दिलेलीं उदाहरणें परदेशांतलीं झालीं. पण खुद्द आपल्या हिंदुस्थानांतच इतर भाषांनीं आपापली उन्नति कशी चालविली आहे याचेंहि सूक्ष्म निरीक्षण केलें असतां मराठीच्या अभिमान्यांस आपल्या मातृभाषेकरितां आपण करावी तशी खटपट अद्याप केलेली नाहीं असेंच वाटूं लागेल.

एका संस्कृतपासून हिंदी, बंगाली, मराठी, गुजराथी आणि गुरुमुखी इतक्या मुख्य भाषा झाल्या असून त्याशिवाय पोटभाषाहि बऱ्याच आहेत. यांचें एकमेकांशीं सख्खेपणाचें नातें आहे. यांनीं आपापला शब्दसंग्रहाचा भरणा करतांना एकमेकांशीं देवघेव केल्यास हरकत नाहीं. तशी ती आजवर होत गेलेलीहि आहे. यांपैकीं बंगालीचा मान बराच वाढला आहे, हें पूर्वीं एकवार सांगितलेंच आहे. पण संस्कृतीनें भिन्न असली, तरी अनेक शतकांच्या साहचर्यानें व शेजारपणानें चुलतनात्यासारखें नातें जुळविलेली जी उर्दू , तिनेंही आपला अभ्युदय कसा तीव्र गतीनें साधण्याची शिकस्त चालविली आहे, तें पाहिल्यासही कमी बोधप्रद होणार नाहीं.

आमच्या मुसलमान बांधवांनीं आपल्याबरोबर उर्दू भाषा हिंदुस्थानांत आणली. इंग्रजी राजसत्तेबरोबर जी गत इतर देशी भाषांची तीच उर्दूचीही झाली. पण मुसलमान बंधूंना आपल्या भाषेची स्थिति सुधारण्याची इच्छा होतांच त्यांनीं जपानी लोकांप्रमाणें सहस्रमुखी प्रयत्न आरंभिले. त्यांना पाठिंबा त्यांच्या निजाम राज्यांत निजाम सरकारकडून मिळाला. ह्मणूनच त्यांचे प्रयत्न इतक्या थोड्या अवधींत इतके फलद्रूप होऊं शकले. आधुनिक शास्त्रकलांच्या बाजूनें उर्दू बिचारी पंगूच होती. पण उर्दूच्या पुरस्कर्त्यांनीं भाषांतरांचा सपाटा

चालवून ग्रंथ.ची भरताड केली आणि विश्वविद्यालयांतून आमूलाग्र मातृभाषेंतून शिक्षणक्रम आंखून टाकला. उस्मानिया युनिव्हर्सिटी घ्या अथवा अलीगड युनिव्हर्सिटी घ्या. उर्दूतून आमूलाग्र शिक्षणक्रम आंखून टाकलेला आहे. त्यांना कोणतीच अडचण कां आड आली नाहीं ? त्यांचे हे प्रयत्न तरी किती अलीकडचे आहेत ? जो उच्च शिक्षणक्रम उर्दूसारख्या भाषेला देखील मातृभाषेंतून पुरा करतां येतो, तोच आमच्या युनिव्हर्सिटीला आमच्या भाषेंतून—मराठींतून—अथवा इतर देशी भाषांतून कां पुरता करतां येऊं नये ? पुण्याचें स्वतंत्र विद्यापीठ स्थापन होईल तेव्हां शिक्षणक्रम आमूलाग्र मराठींतूनच पुरा करण्यासारखी त्याची रचना होईल अशी आशा बाळगण्यास हरकत नाहीं. पण तोंपर्यंत मुंबई युनिव्हर्सिटीनें सुद्धां त्याच दिशेनें प्रयत्न करणें जरूर आहे. आपल्या संस्कृतीची विस्मृति स्नातकांस पडूं नये म्हणून बनारसला हिंदु युनिव्हर्सिटी अस्तित्वांत आली हें खरें, पण भाषेकडे त्या शिक्षणाचा रोख नव्हता. पण १९१६ त बनारसला हिंदु युनिव्हर्सिटी झाल्यानंतर १९२० त अलीगडला लगेच जणूं काय तोडीस तोड म्हणून मुस्लिम युनिव्हर्सिटी अस्तित्वांत आली. महंमदी संस्कृतीच्या रक्षणासाठीं मुस्लिम युनिव्हर्सिटी निघाली. पण हैदराबादला जी उस्मानिया युनिव्हर्सिटी निघाली तिची दूरदृष्टि स्पृहणीय खरी. या युनिव्हर्सिटींत पाश्चिमात्य ज्ञान जरी शिकविलें गेलें तरी तें मातृभाषेंतून. शिक्षणक्रमाला जरूर असलेलीं सर्व पुस्तकें उर्दूत उतरलीं. परंतु **इंग्लिश ही आवश्यक दुसरी भाषा** म्हणून ठेवण्यांत आलेली आहे. आपल्या मराठी विद्यापीठासमोर हा ठळक आदर्श आहे.

उस्मानिया युनिव्हर्सिटीचा हा ठळक आदर्श मातृभाषेच्या पुरस्कर्त्यांच्या नजरेसमोर दिसूं लागला आहे व त्या देखाव्यानें त्यांच्यांत जोराची जागृति देखील केली आहे असें स्पष्ट दिसतें. कारण कराचीच्या इंजिनियरिंग कॉलेजचे प्रि. गोखले यांनीं हल्लींच जो एक "Practical Education" शिक्षणविषयक ग्रंथ लिहिला आहे, त्यांत ते एके ठिकाणीं म्हणतात:—

31 The Vernacular is the language in which the vast majority carry on their daily avocations, and as Mayhew says—The use of English as a means of instruction and the inability of Government to develop the vernaculars have widened the gulf that separates the intelligentsia of India from the masses. So it is now rightly felt by many that we must bestow greater attention on Vernaculars. This means that *time has to be found for the Study of these in our already crowded curriculum—crowded with unessential things."*

हा उतारा आमच्या मताशीं तंतोतंत जुळता आहे हें वाचकांच्या ध्यानांत येईलच. पुस्तक छापखान्यांत छापत असतां हा उतारा आमच्या पहाण्यांत आला व आम्ही तो येथें मुद्दाम उतरला. कारण मुंबई युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमाबद्दल कशा प्रकारचे विचार वावरत आहेत याचा मासला या उताऱ्यावरून आमच्या वाचकांच्या समोर ठेवतां आला.

आमच्या मुंबई युनिव्हर्सिटीनें मातृभाषांच्या सदरांत मराठी, गुजराथी, कानडी, उर्दू, सिंधी, पोर्तुगीज, हिंदी अशा सात भाषांचा समावेश केला आहे. तथापि मुंबई इलाख्यांत तेलगू लोकांची वस्ती असून त्यांनीं आपली सामाजिक संघटना चालविली आहे व भाषेच्या अभिवृद्धीकडे देखील तेलगू बंधू लक्ष पुरवीत आहेत. मुंबई युनिव्हर्सिटींत तेलगूचा प्रवेश झालेला नाहीं, हें पाहून त्यांना वाईट वाटत आहे, आणि म्हणून त्यांनीं युनिव्हर्सिटीशीं भांडावयास सुरवात केली आहे. तेलगू वाङ्मयाशीं आमचा परिचय नाहीं, तथापि तेलगूचे पुरस्कर्ते मातृभाषेंतून अभ्यासक्रम आंखण्याची मागणी करतांना जे मुद्दे पुढें आणतात ते खरोखरच विचारांत घेण्यासारखे आहेत. मातृभाषाभिमान्यांचें मागणें असें आहे कीं, इंग्लिशशिवाय बाकीचे सगळे विषय मातृभाषेंतून शिकविण्यांत यावेत. यांवर इंग्रजीचे पुरस्कर्ते म्हणतात कीं, त्यामुळें इंग्रजी भाषेचें ज्ञानच अपुरें राहील. पण मुलगा मातृभाषेंतून शिक्षण संपादूं लागला कीं तो तो विषय शिकावयास त्याला थोडा वेळ व श्रम पुरेसा

होऊन इंग्रजीकडे अधिक लक्ष पुरवितां येईल. दुसऱ्या तेलगू संमेलनाचे चिटणिस मि. चिंचणकर हे २७।४।२८ ला ' टाइम्स् ऑफ इंडिया ' ला पाठविलेल्या आपल्या पत्रांत म्हणतात:—

32 "I really fail to understand how letting a student to appear in his mother-tongue reduces his capacity to acquire mastery in the English language. Mastery in one's mother tongue facilitates rather than retards his capacity to easily acquire mastery of English."

पहिल्या प्रथम मुलाचें वय फुकट जाऊं नये म्हणून चौथ्या इयत्तेच्या नंतर इंग्लिश शिक्षणास सुरुवात होऊं लागली. आणि चवथ्या इयत्तेच्या मुलास त्याच्या मातृभाषेचें शिक्षण अगदींच कमी असतें. शिवाय चवथ्या इयत्तेंतला मुलगा देखील अगदीं लहान वयाचा असतो. ज्याला आपल्या मातृभाषेच्याच वाक्यरचनेचे नियम पुरतेपणीं कळूं लागले नाहींत, त्याला परकी भाषेच्या नियमांची संगति समजावून घेऊन त्यांची मातृभाषेंतील नियमाशीं तुलना कशी करतां येईल ? अर्थात् पोपटपंचीशिवाय कांहींच दुसरा इलाज चालत नाहीं. आणि असल्याच पोपटपंचीनें सारा धुव्वा उडवून दिलेला आहे. मातृभाषा पुरी कळल्याशिवाय परभाषा शिकविणें बरोबर नाहीं. प्रसिद्ध शिक्षणशास्त्रवेत्ता कोमेनिअस् म्हणतो—

33 "To attempt to teach a foreign language before the mother-tongue has been learned is as irrational as to teach a boy to ride before he can walk."

मराठी बोधभाषा करून उच्च शिक्षणक्रम आंखून तो पुरा करून देण्याचें श्लाघ्य व अवघड कार्य प्रो. कर्व्यांनीं आपल्या महिलाविद्यापीठांत सुरू करून महाराष्ट्रास उत्तम धडा घालून दिलेला आहे. या दृष्टीनें त्यांनीं मराठी भाषेवर केवढे तरी उपकार करून ठेवलेले आहेत. त्यांच्या त्या प्रयत्नांत कांहीं उणीवा असतील तर त्या दुरुस्त करून त्या दिशेनें पुढें प्रयत्न करण्यास मार्ग मोकळा आहे. इच्छा असेल तेथें वाटा हव्या तेवढ्या सांपडतात. मराठी भाषा मातृभाषा

म्हणून, संस्कृत मराठीचा झरा म्हणून आणि इंग्रजी आवश्यक म्हणून अशा तीन भाषा कशा शिकवाव्या ? विद्यार्थ्यांवर फार बोजा होतो, असा आक्षेप घेण्यांत हांशील नाहीं. या तीनही भाषा आवश्यक आहेत. विद्यार्थ्यांच्या बोजाबद्दल कळकळ बाळगणारांना इतर पुष्कळ छाटाछाट करतां येण्यासारखी आहे.

मराठींतून शिक्षणक्रम मिळूं लागल्यानंतर विद्यार्थ्यांवरचा बोजा इतका कमी होईल कीं त्यांना आहे हा शिक्षणक्रमही सध्याच्या इतका डोईजड होणार नाहीं. असें असूनही छाटाछाट करावी लागलीच, तर थोडयाच वर्षांपूर्वीं कॉलेजचा ऑल्जिब्रा जो मॅट्रिकला आणून ठेवला, तो परत वरती चढविला तर.? अशाच आणखीही बारीक सारीक छाटाछाटी करून कांहीं तरी सोय.लावतां येईल. पण मराठीच्या संसाराचा खेळखंडोबा यापुढें करतां येणें शक्य नाहीं.

अभ्यासाची छाटाछाट करा अगर करूं नका विद्यार्थ्यांना अभ्यासाचा जादा भार सहन करावा लागला तरी देखिल हरकत नाहीं. पण मातृभाषेला अभ्यासक्रमांत स्थळ अवश्यमेव मिळालेंच पाहिजे असें म्हणण्यापर्यंत विचारवंतांची मजल गेली आहे. तरी देखील युनिव्हर्सिटी मातृभाषांची गळेचेपीच करीत राहणार आहे काय ? आमच्या म्हणण्यास पुरावा वरील प्रि. गोखले यांचाच पुढें दिला आहे.

प्रि. गोखले म्हणतातः—

34 Vernacularists might benefit by the experience of Japan, who achieve their end by flooding their language with a "crowd of translations, and other works intended to popularise the new conceptions and Fwakura's world embassy published a number of Volumes which helped to open the eyes of the public by their description of history, politics, finance, education and military organization of the different States visited." So far as we are aware, the Osmania University is the only University in India

वाङ्मयाची वृद्धि झाली पाहिजे आणि मराठी भाषेचा अभ्यास शिक्षणक्रमांत आमूलाग्र होऊन घरोघरहि झाला पाहिजे. मराठीनें आज आपल्या हातानें वाढलेलें अन्न महाराष्ट्र मंदिरांतील मराठी लेकरांनीं सेवन केलें तरच हें असलें बाळसें चढणार. नाहीं तर महाराष्ट्रीय लोक अकालीं पोक्त दिसूं लागणार ( लागत आहेतही !) म्हणून मराठीचा संसार थाटमाटांत चाललेला आपण पाहिला पाहिजे. मराठीच्या स्वतंत्र संसारावरच आज महाराष्ट्राच्या भावी पिढीचा तरणोपाय आहे. मेकॉले साहेबांचें म्हणणें खरें असेल तर इंग्रजी वाङ्मयाबरोबर इंग्रजांचे गुण व इंग्रजांची स्वातंत्र्यप्रियता महाराष्ट्रांत त्यांच्याबरोबर आतां पसरलीच पाहिजे.

---